# अनुक्रमणिका.



---



# चिमुकलें भारत.

## पहिले चार शब्द.



मुलांनो, आंधळा मनुष्य व डोळस मनुष्य यांमधलें अंतर तुम्हांला समजतें ना? आंधळ्या मनुष्याला किती बरें दुःखें भोगावीं लागतात! या जगांतील सुंदर सुंदर वस्तु पाहून डोळस मनुष्याला जो आनंद होतो, त्याला आंधळा मनुष्य मुकतो. ज्या देवानें मनुष्याच्या कल्याणाकरितां हें सुंदर जग उत्पन्न केलें, व त्याच्या सुखाकरितां शेंकडो वस्तु त्यांत भरून ठेविल्या, तो देव किती बरें दयाळू आहे, असा विचार हें सुंदर जग पाहून डोळस मनुष्याच्या मनांत येतो. व ईश्वरावर तो प्रेम करूं लागतो. तसें आंधळ्याचें कांहीं

होत नाहीं. दुसरें असें कीं, आंधळ्याला चालतांना किती बरें कष्ट होतात? त्याला ठेंचा लागतात, तो जागजागीं पडतो, किंवा भलत्याच वाटेला जातो. किंवा दुसरा कोणी नेईल, तिकडे त्याला जावें लागतें. तसें कांहीं डोळस माणसाचें होत नाहीं. तो स्वाधीन असतो. त्याला दुसऱ्याच्या तंत्रानें चालावें लागत नाहीं.

मुलांनो, ज्ञानी मनुष्य हा डोळस माणसासारखा व अज्ञानी मनुष्य हा आंधळ्या माणसासारखा आहे. आंधळ्या माणसाला जशीं अनेक दुःखें भोगावीं लागतात, तशींच अज्ञानी माणसालाही या जगांत भोगावीं लागतात. कसें वागलें असतां मनुष्याला खरें सुख होतें, हें अज्ञानी माणसाला समजत नाहीं. त्यामुळें तो जागोजाग फसतो, दुःखांत पडतो. ज्ञान्याचें तसें होत नाहीं. चांगला मार्ग कोणता, वाईट कोणता, हें ज्ञान्याला समजतें. म्हणून जगांत त्याला सुख होतें, व मोठेपणा मिळतो.

आपण मोठें व्हावें, सुखी व्हावें, असें सगळ्या माणसांना वाटतें. तसें मुलांनो, तुम्हांला

पण वाटत आहेच. पण जर तुम्ही ज्ञान मिळविण्याला या लहान वयांत झटलां नाहीं, तर तुम्हांला मोठेपणीं खरें सुख कांहीं होणार नाहीं. तेव्हां हें ज्ञान मिळविण्याचा तुम्ही चांगला प्रयत्न करा. ज्ञान मिळविण्याचे अनेक मार्ग आहेत. चांगलीं चांगलीं पुस्तकें वाचणें हा त्यांतला एक मार्ग आहे.

आपल्या धर्मांत पुष्कळ चांगले चांगले ग्रंथ आहेत. कसें वागलें असतां मनुष्याला संसारांत सुख होईल, व देवाची त्याच्यावर कृपा होईल, हें त्यांत सांगितलें आहे. असे जे आपले मोठे मोठे ग्रंथ आहेत, त्यांत महाभारत नांवाचा एक ग्रंथ आहे. त्यांत ज्ञान पुष्कळ सांठवलेलें आहे. पण तो फारच मोठा ग्रंथ आहे. तुम्हांला आज तो सगळा समजणार नाहीं. तेव्हां तुम्हांला समजेल, अशा अगदीं सोप्या शब्दांत त्या ग्रंथांत काय सांगितलें आहे, हें तुम्हांला सांगावें, असें मनांत आहे.

आतां पहिल्यानें तुम्हांला ‘ महाभारत ’ या शब्दाचा अर्थ सांगतों. यांत दोन शब्द आहेत.

‘ महा ’ आणि ‘ भारत.’ ‘ महा ’ म्हणजे मोठा; आणि ‘ भारत ’ म्हणजे भरत राजाचा वंश. तेव्हां, ज्यांत भरत राजाच्या वंशांतील पुरुषांची हकीगत सांगितली आहे, असा मोठा ग्रंथ, तें ‘ महाभारत. ’ दुष्यंत नांवाचा एक राजा होता. त्याचा पुत्र भरत. याच राजांच्या वंशांत पुढें कौरव व पांडव उत्पन्न झाले. ते फार पराक्रमी होते. कौरव व पांडव हे चुलतभाऊ. कौरव शंभर होते. त्यांत दुर्योधन हा मोठा. बहुतेक कौरव दुष्ट होते. त्यांत हा दुर्योधन तर फारच दुष्ट होता. पांडव हे पांच भाऊ होते. पण ते सगळे चांगले, सरळ व धर्मानें वागणारे होते. देवावर त्यांची फारच भक्ति होती. या कौरव-पांडवांत पुढें फार मोठें युद्ध झालें. पांडव धर्मानें वागणारे असल्यामुळें या युद्धांत देवानें त्यांना चांगली मदत केली. देवाच्याच कृपेनें या युद्धांत पांडवांना जय मिळाला, व दुष्ट कौरवांचा त्यांच्या हातून नाश झाला. हें युद्ध अठरा दिवस चाललें होतें. याला ‘ भारतीय युद्ध ’ म्हणतात. हीच कौरव व पांडव यांची हकीगत महाभारतांत

आहे. श्रीवेदव्यास नांवाचे एक थोर ऋषि होते, त्यांनीं हा ग्रंथ लिहिला.

---

## महाभारताचे भाग.



या महाभारताचे एकंदर अठरा भाग आहेत. त्यांतल्या प्रत्येक भागाला ‘ पर्व ’ असें नांव आहे. श्रीमद्भगवद्गीता हें नांव तुम्ही ऐकलें असालच. तो ग्रंथ आपल्यांत अतिशय पूज्य मानितात. त्यांत श्रीकृष्णानें अर्जुनाला उत्तम उपदेश केला आहे. फारच चांगला ग्रंथ आहे तो. आपल्यांतले पुष्कळ लोक रोज नेमानें तो वाचतात. तो ग्रंथ मूळ या महाभारतांतलाच आहे. या ग्रंथाचेही भाग किंवा अध्याय अठराच आहेत. अर्जुनाचें ‘ जय ’ असें एक नांव आहे. ‘ जय ’ याचा संस्कृतांत अठरा असाही अर्थ होतो. तेव्हां या महाभारतांत अठरा या संख्येची मोठी मौज आहे. नाहीं बरें ? असो.

आतां महाभारतांतील अठरा पर्वांचीं नांवें, व तीं नांवें पडण्याचीं कारणें, हीं तुम्हांला सांगतों:—

१ आदिपर्व. आदि म्हणजे आरंभ. कौरव व पांडव यांच्या वंशाची मूळ कथा यांत आहे. व त्यांच्या कथेलाही याच पर्वांत आरंभ झाला आहे. म्हणून याला 'आदिपर्व' म्हटलें आहे.

२ सभापर्व. यांत तीन मोठ्या सभांची हकीगत सांगितली आहे; म्हणून या पर्वाला 'सभापर्व' असें नांव दिलें आहे.

३ वनपर्व. पांडवांनीं वनांत बारा वर्षें काढलीं. त्या काळांतली त्यांची सगळी हकीगत या पर्वांत आहे. म्हणून याला 'वनपर्व' असें नांव मिळालें आहे.

४ विराटपर्व. पांडव अज्ञातवासांत म्हणजे गुप्तपणें एक वर्षपर्यंत विराटराजाच्या घरीं होते. तेथें घडलेली हकीगत या पर्वांत सांगितली आहे. म्हणून याला 'विराटपर्व' असें म्हटलें आहे.

५ उद्योगपर्व. वनवास व अज्ञातवास पूर्ण झाल्यानंतर कौरवांपासून आपलें राज्य परत घेण्याच्या उद्योगाला पांडव लागले. ही हकीगत या पर्वांत आहे. म्हणून याला 'उद्योगपर्व' असें नांव दिलें आहे.

६ भीष्मपर्व. कौरव व पांडव यांचें युद्ध सुरू झालें, तेव्हां पहिले दहा दिवस भीष्म हा कौरवांचा सेनापति होता. त्या वेळीं त्यानें पांडवांशीं जें भयंकर युद्ध केलें, त्याचें वर्णन या पर्वांत आहे. म्हणून यास 'भीष्मपर्व' असें म्हटलें आहे.

७ द्रोणपर्व. भीष्माचेमागून द्रोणाचार्य हे कौरवांचे सेनापति झाले. ते सेनापति असतांना जें युद्ध झालें, त्याचें वर्णन या पर्वांत आहे. म्हणून याला 'द्रोणपर्व' असें नांव मिळालें आहे.

८ कर्णपर्व. द्रोणाचार्यांनंतर कर्णानें कौरवांच्या सेनापतीचें काम केलें. त्या वेळीं घडलेली युद्धाची हकीगत या पर्वांत सांगितली आहे. म्हणून याला 'कर्णपर्व' असें म्हटलें आहे.

९ शल्यपर्व. कर्ण मेल्यानंतर शल्य हा कौरवांचा सेनापति झाला. त्यानें एकच दिवस सेनापतीचें काम केलें. त्या दिवसाच्या युद्धाची हकीगत या पर्वांत दिली आहे. म्हणून यास 'शल्यपर्व' असें नांव मिळालें आहे.

१० सौप्तिकपर्व. सुप्त म्हणजे निजलेला. 'सुप्त' या शब्दापासून 'सौप्तिक' हा शब्द झालेला आहे. त्याचा अर्थ 'निजलेल्या विषयीं' असा होतो. द्रौपदीचे पांच पुत्र व पांडवांच्या बाजूचे कांहीं वीर हे लढाई समाप्त झाल्यानंतर आपल्या छावणींत स्वस्थ निजले असतां अश्वत्थाम्यानें त्यांचेवर छापा घालून त्या सर्वांना ठार मारलें. ही कथा या पर्वांत सांगितली आहे. म्हणून याला 'सौप्तिकपर्व' असें नांव दिलें आहे.

११ स्त्रीपर्व. सर्व कौरव रणांत मारले गेले; यामुळें त्यांच्या स्त्रियांनीं जो शोक केला, त्याचें वर्णन या पर्वांत केलें आहे. म्हणून याला 'स्त्रीपर्व' असें म्हटलें आहे.

१२ शांतिपर्व. युद्ध संपलें. जिकडे तिकडे शांतता झाली. या शांतीच्या किंवा शांततेच्या वेळांत जी कांहीं हकीकत झाली, ती या पर्वांत दिली आहे. म्हणून याला 'शांतिपर्व' असें नांव दिलें आहे.

१३ अनुशासनपर्व. अनुशासन म्हणजे उपदेश. भीष्मानें मरतांना पांडवांना जो उपदेश

केला, तो या पर्वांत दिला आहे. म्हणून याला ' अनुशासनपर्व ' असें म्हटलें आहे.

१४ अश्वमेधपर्व. अश्व म्हणजे घोडा, आणि मेध म्हणजे यज्ञ. एक प्रकारचा यज्ञ आहे, त्यांत एक घोडा पृथ्वीवर मोकळा सोडतात. पुष्कळ सैन्य त्या घोड्याचें रक्षण करण्याकरितां त्याचे मागून जातें. जो कोणी घोडा मध्यें धरून ठेवील, त्याच्याशीं तें सैन्य युद्ध करून घोडा सोडवितें. अशा रीतीनें सर्व पृथ्वी फिरून तो घोडा परत आला, कीं यज्ञ पुरा करितात. असे यज्ञ आपल्या-कडे पूर्वी करीत असत. हल्लीं करीत नाहींत. पांडवांनीं या अश्वमेधाला आरंभ केला, घोडा सोडला व दिग्विजय करून ( म्हणजे सर्व दिशांच्या राजांना जिंकून ) यज्ञ शेवटास नेला. ही यज्ञाची हकीगत या पर्वांत आहे. म्हणून याला ' अश्वमेधपर्व ' असें नांव दिलें आहे.

१५ आश्रमवासिकपर्व. धृतराष्ट्र, विदुर वगैरे मंडळी अरण्यांत गेली. व आश्रम बांधून तेथें त्यांनीं वास ( राहणें ) केला. ही कथा या

पर्वांत आहे. म्हणून यास ' आश्रमवासिकपर्व ' असें नांव ठेविलें आहे.

१६ मौसलपर्व. मुसल ( मुसळ ) या शब्दापासून मौसल हा शब्द झाला आहे. ' मुसळाविषयीं ' असा त्याचा अर्थ आहे. कांहीं चमत्कारानें एक मुसळ उत्पन्न झालें. व त्याच्या योगानें पुढें सर्व यादव-कुळाचा नाश झाला. ही कथा यांत सांगितली आहे. म्हणून या पर्वाला ' मौसलपर्व ' असें म्हटलें आहे.

१७ महाप्रास्थानिकपर्व. प्रस्थान म्हणजे निघणें. प्रास्थानिक म्हणजे ' निघण्याविषयीं.' पांडव द्रौपदीसह स्वर्गाला जाण्याकरितां शेवटीं निघाले. ही कथा यांत सांगितली आहे. म्हणून या पर्वाला ' महाप्रास्थानिकपर्व ' असें म्हटलें आहे.

१८ स्वर्गारोहणपर्व. स्वर्गारोहण=स्वर्ग+आरोहण. आरोहण म्हणजे चढणें, जाणें. पांडव स्वर्गलोकीं गेले, ही हकीगत या पर्वांत आहे. म्हणून याला ' स्वर्गारोहणपर्व ' असें नांव दिलें आहे.



# चिमुकलें भारत.

## १ आदिपर्व.



### कौरव व पांडव.

फार प्राचीन काळीं दुष्यंत या नांवाचा एक राजा होऊन गेला. त्याचा मुलगा भरत हा अत्यंत पराक्रमी होता. त्याच्यावरून त्याच्या सर्व वंशाला भरतकुल असें नांव पडलें. पुढें याच कुळांत शंतनु या नांवाचा एक राजा झाला. हा फार चांगला राजा होता. यानें अगदीं धर्मानें आपल्या प्रजेचें पालन केलें. यामुळें त्याची प्रजा फार सुखी होती. या शंतनुराजाला देवव्रत. चित्रांगद व विचित्रवीर्य असे तीन मुलगे होते. यांपैकीं देवव्रतानें आपल्या बापाची कांहीं चिंता दूर

करण्याकरितां असा पण केला होता कीं, मी कधींही लग्न करणार नाहीं, व राज्याची इच्छाही करणार नाहीं. हा आपला पण त्यानें अखेर-पर्यंत पाळला. **जो आपलें वचन कधींही मोडीत नाहीं, तोच मनुष्य खरा. त्याची मोठी कीर्ति होते.** त्याप्रमाणें या देवव्रताची झाली. या त्याच्या भयंकर पणामुळें त्याला भीष्म ( कडक अथवा उग्र ) असें नांव पडलें. भीष्म हा वच-नाचा धड, अत्यंत पराक्रमी, न्यायी, वर्तनानें शुद्ध व देवावर अत्यंत भक्ति करणारा असा होता. बापावरही त्याची फारच भक्ति होती. बापाला सुख झालें, म्हणजे तेंच आपलें सुख, असें तो मानी. मुलांनो, तुम्ही या भीष्मा-प्रमाणें आपलें सगळें वर्तन चोख ठेवण्याचा प्रयत्न करा. तेणेंकरून तुम्हांला सुख होईल.

असो. चित्रांगद हा एका लढाईत पडला. तेव्हां शंतनूचा धाकटा मुलगा विचित्रवीर्य यास बापाच्यामागें गादी मिळाली. या विचित्रवीर्याला तीन पुत्र होते–धृतराष्ट्र, पांडु, व विदुर. आपल्या भावाच्या या तिन्ही मुलांना भीष्मानें उत्तम

विद्या शिकवून तयार केलें होतें. शस्त्रास्त्रविद्या व राजनीति यांतही ते निपुण होते. या तीन मुलांत धृतराष्ट्र हा जन्मापासून आंधळा होता. यामुळें बापाच्यामागें गादीवर बसण्याला तो अयोग्य ठरला. तेव्हां मधला मुलगा पांडु यास गादी मिळाली.

पांडुराजाला कुंती व माद्री अशा दोन राण्या होत्या. कुंतीला तीन पुत्र झाले—युधिष्ठिर, भीम व अर्जुन; आणि माद्रीला दोन झाले—नकुल आणि सहदेव. असे एकंदर पांच पुत्र पांडूला होते. यांना पांडव म्हणत. पांडुराजा लवकरच मरण पावला. त्याच्याबरोबर त्याची धाकटी राणी माद्री ही सती गेली. मग धृतराष्ट्र गादीवर आला.

धृतराष्ट्राच्या राणीचें नांव गांधारी असें होतें. तिला शंभर पुत्र व एक कन्या अशीं एकशें-एक मुलें झालीं. या मुलीचें नांव दु:शीला. धृतराष्ट्राचे मुलगे कौरव या नांवानें प्रसिद्ध होते. त्यांत दुर्योधन हा सर्वांत मोठा. हा फार शूर व पराक्रमी होता; पण स्वभावानें तो फारच वाईट व

दुष्ट होता. दुसऱ्याचें बरें झालेलें त्याला पाहवत नसे. तसाच तो हट्टी व आपमतलबी होता. सर्व सुखें आपल्यालाच मिळावीं, सर्व सत्ता आपल्याच हातांत असावी, असें त्याला वाटे. सर्व राज्य आपल्यालाच मिळावें व बाकी सगळ्यांनीं आपल्या हुकुमांत वागावें, ही त्याची काय ती इच्छा! आपला बाप वडील होता, पण तो आंधळा असल्यामुळें त्याला गादी मिळाली नाहीं, आपला चुलता **पांडु** याला ती मिळाली; पण त्यामुळें आपला गादीवरचा हक्क गेला; आतां ती **पांड**वांना मिळणार; असे विचार नेहमीं त्याच्या मनांत घोळत असत. त्यामुळें त्याला अगदीं चैन पडत नसे. कोणत्या तरी उपायानें **पांड**वांचा नाश करून आपण आपलें राज्य परत मिळविलें पाहिजे, असे घातकी विचार बाळपणापासून त्याच्या डोक्यांत येऊं लागले होते.

धृतराष्ट्राचा अगदीं धाकटा भाऊ **विदुर** हा एका दासीच्या पोटीं झाला होता. तो फारच चांगला होता. तो शहाणा व न्यायी असून

देवाचा मोठा भक्त होता. त्याचें वर्तन अगदीं निर्मळ असें असे.

---

## कौरवपांडवांचें बाळपण.



धृतराष्ट्राचे मुलगे कौरव व पांडूचे मुलगे पांडव यांचें सगळें बाळपण एकत्रच गेलें. ते लहानपणीं एके जागींच विद्या शिकले, खेळले व वाढले. कृपाचार्य हे त्यांचे पहिले गुरु होते. ते त्यांना पहिल्यानें शस्त्रास्त्रविद्या शिकवीत असत. पुढें द्रोणाचार्य हे त्यांचे गुरु झाले. कौरवपांडवांत युधिष्ठिर हा सगळ्यांत वडील होता. हा स्वभावानें अगदीं शांत असून नेहमीं चांगल्या मार्गानेंच चालणारा होता. तो कधीं खोटें बोलत नसे व कोणतेंही पाप करीत नसे. असा तो धर्मानें वागणारा असल्यामुळें त्याला धर्म असें नांव मिळालें होतें. भीम हा बळानें फार मोठा होता; आपल्या अंगच्या शक्तीनें तो सगळ्यांची अगदीं खोड मोडीत असे. कौरवांची तर तो अगदीं फजिती फजिती करी. यामुळें ते त्याच्या-

वर भारी चिडत. दुर्योधन तर त्याच्यावर मनांत अगदीं जळत असे. पांडवांतला तिसरा भाऊ अर्जुन हा फारच बुद्धिमान् होता. तसाच तो शस्त्रास्त्रविद्येंत चांगला निपुण होता. शूरपणांत त्याची बरोबरी करणारा कोणीही नव्हता. त्याची देवावर फार भक्ति होती; तशीच गुरूवरही होती. तो विद्येंत चांगला असून नम्र व आज्ञेंत वागणारा असल्यामुळें त्याच्या गुरूंचेंही त्याजवर फार प्रेम असे. बरोबरच आहे, शिष्य चांगला अभ्यास करणारा व गुरूच्या आज्ञेंत राहणारा असला, म्हणजे गुरूला तो विशेष आवडता होतोच. असे सगळे चांगले गुण अर्जुनाचे अंगीं असल्यामुळें त्याची जिकडे तिकडे वाहवा होई. त्यामुळेंही कौरवांच्या पोटांत दुखे. पांडवांतले धाकटे दोघे भाऊ नकुल आणि सहदेव हेही शस्त्रास्त्रविद्येंत पटाईत होते. या पांची भावांचें एकमेकांवर फारच प्रेम होतें. ते अगदीं जुटीनें राहात. त्यांचा वडील भाऊ जो धर्म त्याच्या आज्ञेंत सगळे असत. हे सगळे पांडवांच्या आंगचे गुण पाहून दुर्योधनादि कौरव त्यांचा फारच द्वेष करीत.

पांडवांचा आणखी एक भाऊ होता. त्याचें कर्ण असें नांव होतें. पण हा आपला भाऊ आहे, असें पांडवांना कांहीं ठाऊक नव्हतें. तो जन्मल्याबरोबर त्याच्या आईनें त्याला नदींत टाकून दिलें. पुढें तो अधिरथ नांवाच्या एका सारथ्याच्या हातीं लागला. त्या सारथ्यानें त्याला आपल्या मुलाप्रमाणें वाढविलें. तो कौरवपांडवांबरोबर द्रोणाचार्यांजवळ शस्त्रास्त्रविद्या शिकला. तो चांगला शूर होता. लहानपणीं कौरवपांडवांचे भांडणांत तो नेहमीं कौरवांचे बाजूला असे. पुढें दुर्योधनानें त्याला अंग देशाचें राज्य दिलें. यामुळें कौरवांचा पक्ष केव्हांही सोडावयाचा नाहीं, असा त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें तो अखेरपर्यंत त्यांच्याच बाजूला होता. तो स्वभावानें मोठा उदार असे.

असो. भीम हा बळानें सगळ्यांना भारी होता, हें मागें सांगितलेंच आहे. तो कौरवांना अगदीं नको नकोसें करीत असे. धांवण्यांत, खेळण्यांत, खाण्यांत तो सर्व कौरवांना अगदीं हटवून टाकी. कौरव आनंदानें खेळत असले, कीं हा मध्येंच

शिरून त्यांच्या डावाचा विरस करी. ते भांडूं लागले, कीं जोरानें त्या सगळ्यांच्या शेंड्या धरून व त्यांना लाथेनें तुडवून जमिनीवरून त्यांना कोस कोस ओढीत तो नेत असे. पाण्यांत खेळ-तांना दहा दहा जणांना बगलेंत धरून तो पाण्यांत बुडून राहांत असे. कौरव झाडावर चढून फळें तोडूं लागले, म्हणजे तो जोरानें सर्व झाड इतकें हलवून टाकी कीं, ते सगळे धडधड खालीं पडत. अशा त्याच्या खोड्या किती म्हणून सांगाव्या ! त्यांमुळें कौरव दिवसें दिवस त्याचा फारच द्वेष करूं लागले. कारण, कांहीं केलें, तरी त्याची बरोबरी त्यांच्यानें होईना. कांहीं तरी करून हा भीमाचा कांटा एकदां काढून टाकावा, असे विचार दुर्योधनाच्या मनांत सारखे घोळूं लागले. असें होतां होतां शेवटीं त्यानें एकदां संधी साधून भीमाच्या अन्नांत विष घातलें. आणि भीम जेव्हां विषाच्या अंमलानें बेशुद्ध झाला, तेव्हां त्यानें त्याला उचलून नदींत फेंकून दिलें. पण 'देव तारी त्याला कोण मारी,' असें म्हणतात, तसें इथें झालें. भीम नदीच्या तळीं

गेला, तिथे त्याला अनेक साप डसले. व त्या नागांच्या विषानें त्याच्या आंगांतलें विष मरून गेलें. मग तेथून तो चांगला हुशार होऊन आठ दिवसांनीं घरीं परत आला. त्यानें झालेली सगळी हकीगत आपल्या भावांना सांगितली. त्यानें दुर्योधनाचा या वेळीं चांगलीच सूड घेतला असता, पण धर्म व विदुर यांनीं सांगितल्यावरून त्यानें त्याला एक वेळ गय केली.

---

## लाखेचें घर.

पांडव आपल्या विद्येनें, गुणांनीं व पराक्रमानें सर्व लोकांना दिवसें दिवस अधिकच आवडूं लागले. ज्यांच्या त्यांच्या तोंडीं आपलीं त्यांचींच नांवें, असा प्रकार झाला. त्यांनीं आपल्या पराक्रमानें अनेक राजांवर स्वाऱ्या करून त्यांना जिंकून टाकलें. यामुळें त्यांची कीर्ति जिकडे तिकडे पसरली. हें पाहून कौरवांना अगदीं चैन पडेना. आतां या पांडवांना खाऊं कीं गिळूं, असें त्यांना होऊन गेलें. बरोबरच आहे, **चांगल्यांचें बरें झालें म्हणजे तें वाई**

टांना कसें पाहवेल? इतक्यांत युधिष्ठिराला धृत-राष्ट्रानें 'युवराज' केलें. म्हणजे आपल्या मागें त्यालाच गादी मिळावी, असें ठरविलें. व आपल्या गुणांनीं लोकांना तो फारच आवडता झाला. हें पाहून तर दुर्योधनाच्या आंगाचा नुसता तिळ-पापड झाला. गांधार देशाचा राजा शकुनि हा दुर्योधनाचा मामा. तो मोठा कपटी व दुष्ट होता शकुनि, कर्ण, दुर्योधन आणि दुःशासन यांनीं आपसांत बेत करून असें ठरविलें कीं, पांडवांना कांहीं निमित्तानें कोठें तरी पाठवून द्यावें व तिकडेच त्यांचा घात करावा. त्याप्रमाणें त्यांना कोठें तरी पाठविण्याविषयीं दुर्योधनानें धृतरा-ष्ट्राचेंही मन वळविलें. वारणावत नांवाच्या गांवीं एक मोठी जत्रा व्हावयाची होती. ती जत्रा पाह-ण्यास तुम्ही जा, असें धृतराष्ट्रानें पांडवांना सांगितलें. त्यांनींही तें मोठ्या हौसेनें कबूल केलें. याप्रमाणें बेत कायम झाला, तेव्हां दुर्योधनानें पुरोचन नांवाच्या एका विश्वासू कारागिराला पुढें वारणावताला पाठवून त्याकडून पांडवांना राह-ण्यासाठीं लाख, गंधक वगैरे लवकर पेटणाऱ्या

पदार्थांचा एक मोठा वाडा तयार करविला. पांडव तेथें राहण्यास आले, म्हणजे एके रात्रीं त्या वाड्याला चारी बाजूंनीं आग लावावी, म्हणजे ते सगळे आपोआप आंत भाजून मरतील, असा त्यांचा बेत होता. पांडव वारणावताला येण्यास निघाले, तेव्हां विदुरानें हळूच त्यांना पुढील संकटाची सूचना देऊन ठेविली. ती सूचना ध्यानांत ठेवून ते नेहमीं सावध राहात. ते रोज नेमानें कोठें तरी शिकारीला जात. असें होतां होतां त्यांना आसपासच्या सर्व जंगलांची उत्तम माहिती झाली. रात्रीं वाड्यांत असतांना ते नेहमीं हत्यारबंद असत. तसाच कांहीं प्रसंग आला, तर गुप्तपणें पळून जाऊन आपले जीव वांचवितां यावे, म्हणून त्या वाड्यांतून दूर एका जंगलापर्यंत त्यांनीं एक भुयारही खणून ठेविलें होतें. शेवटीं एके दिवशीं मध्यरात्रीं पुरोचन निजला होता, त्याच ठिकाणीं तें घर पेटवून देऊन चोहोंकडून तें पेटल्यावर भीम आपले भाऊ व आई यांना घेऊन भुयाराच्या वाटेनें अरण्यांत निघून गेला. घर पेटलेलें

पाहून गांवांतील लोक फार हळहळले. कारण पांडव जळून मेले, असें त्यांला वाटलें. असें वाटण्याला कारण असें झालें कीं, त्याच रात्रीं एक वाटसरू बाई आपल्या पांच मुलांना घेऊन तेथें वसतीस आली होती. त्यांचीं जळकीं प्रेतें पाहून पांडव कुंतीसह जळून गेले, असा सर्वांचा समज झाला. तेणेंकरून कौरवांना मनांतले मनांत फारच आनंद झाला. तथापि वरकरणीं त्यांनीं पांडवांकारितां अत्यंत शोक केला. विदुरालामात्र खरी गोष्ट ठाऊक होती. म्हणून त्याला कांहींच वाईट वाटलें नाहीं.

---

## हिडिंबेशीं भीमाचें लग्न.



पांडव भयाण अरण्यांतून चालले असतां कुंतीला फारच तहान लागली. तेव्हां सर्वांना एका झाडाखालीं बसवून भीम पाण्याचा शोध कर-ण्याला गेला. कांहीं वेळानें तो पाणी घेऊन परत आला. तो आला तेव्हां त्याचे भाऊ व आई यांना झोंप लागली होती, तेव्हां तीं उठण्याची तो वाट

पाहात बसला. इतक्यांत हिडिंब नांवाचा एक राक्षस तेथें आला. त्याच्याशीं युद्ध करून भीमानें त्याला ठार मारिलें. याच राक्षसाची हिडिंबा या नांवाची एक बहीण होती. आपले भाऊ व आई यांच्या सांगण्यावरून भीमानें तिच्याशीं लग्न केलें. या हिडिंबेपासून त्याला एक पुत्र झाला. त्याचें नांव घटोत्कच. हा घटोत्कच भीमाप्रमाणेंच पराक्रमी होता.

———

## बकासुराचा वध.

—:०:—

हिडिंब राक्षसाचा वध केल्यानंतर मत्स्य, त्रिगर्त, पांचाल, कीचक वगैरे देशांच्या रानांवनांतुन पांडव भटकत असतां त्यांना एकदां श्रीव्यासांचें दर्शन झालें. त्यांच्या सांगण्यावरून ते एकचक्रा नगरींत येऊन एका ब्राह्मणाच्या घरीं बिऱ्हाड करून राहिले. ते भिक्षा मागून आपला निर्वाह करीत असत. याच नगरींत बक नांवाचा एक राक्षस होता. त्याला कांहीं अन्न, दोन रेडे व एक माणूस इतकें खाण्याकरितां रोज

पोसावयाचें गांवकऱ्यांनीं कबूल केलें होतें. प्रत्येक घरानें हें अन्न आळीपाळीनें द्यावयाचें असे. एक दिवस ज्या ब्राह्मणाचें घरांत पांडव राहिले होते, त्याचे घरावर ही पाळी आली. तेव्हां कोणीं बळी जावयाचें, याबद्दल त्या कुटुंबांत तंटा सुरू झाला. प्रत्येक माणूस म्हणे, मी जाणार. शेवटीं कुंतीच्या सांगण्यावरून भीम त्या दिवशींचें अन्न घेऊन त्या राक्षसाकडे गेला. व राक्षसाचे देखत तें अन्न स्वतांच खाऊं लागला. राक्षसानें संतापानें त्याची पाठ खूप बुकलली. तरी भीम स्वस्थपणें अन्न खातच होता. खाऊन झाल्यावर त्यानें त्या राक्षसाला सहज मारून टाकलें. दुसऱ्या दिवशीं त्याचें तें भयंकर प्रेत जेव्हां गांवकऱ्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांना फार आनंद झाला.

---

## द्रौपदी-स्वयंवर.

—:०:—

पांचाल देशाचा द्रुपद नांवाचा राजा होता. त्याला एक कन्या होती. तिचें नांव द्रौपदी. या द्रौपदीचा स्वयंवर होणार आहे, अशी बातमी



राक्षसाचे देखत (भीम) तें अन्न स्वतांच खाऊं लागला.

पांडवांना याच सुमारास श्रीव्यास यांनीं कळविली, व तुम्ही त्या स्वयंवराला जा, असेंही त्यांनीं त्यांना सांगितलें. घरवाल्या ब्राह्मणाचा निरोप घेऊन श्रीव्यासांचे आज्ञेप्रमाणें पांडव कुंतीसह पांचालाला जाण्यास निघाले. वाटेंत अंगारपर्ण या नांवाच्या एका गंधर्वाशीं अर्जुनाचें युद्ध होऊन अर्जुनानें त्याचा पराभव केला. पण धर्माच्या आज्ञेवरून त्यानें त्याला जिवंत सोडलें. याबद्दल अर्जुनावर संतुष्ट होऊन त्या गंधर्वानें त्याला आपलें दिव्य अस्त्र दिलें. व धौम्य ऋषींना आपले गुरु करा, असें पांडवांना सांगून व त्यांच्या आश्रमाची त्यांना वाट दाखवून तो निघून गेला. त्याप्रमाणें पांडवांनीं धौम्यांना आपले गुरु करून त्यांच्यासह ते पुढें निघाले. ते पांचाल देशाला आल्यावर एका कुंभाराच्या घरीं बिऱ्हाडाला उतरले. त्यांनीं ब्राह्मणांचा वेष घेतला होता. ते रोज भिक्षा मागून आपला निर्वाह चालवीत असत. शेवटीं स्वयंवराचा दिवस आला. तेव्हां धौम्य ऋषि पांडवांसह मंडपांत गेले. या स्वयंवराकरितां दुर्योधनादि कौरव, कर्ण, शकुनि,

जयद्रथ, शिशुपाल, जरासंध, वगैरे मोठमोठे पराक्रमी राजे आले होते. त्याचप्रमाणें बळराम व श्रीकृष्ण हे दोघे भाऊही द्वारकेहून आले होते.

द्रौपदीच्या बापानें एका फिरत्या यंत्रांत एक फिरतें निशाण लावून ठेविलें होतें. तें निशाण पांच बाणांत जो पाडील, त्याला द्रौपदी माळ घालील, असा पण त्यानें लाविला होता. दुर्योधन, शल्य, शिशुपाल, वगैरे अनेक राजांनीं निशाण मारण्याचा प्रयत्न केला; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. इतक्यांत कर्ण पुढें आला; पण 'मी सारथ्याला वरणार नाहीं,' असें द्रौपदी म्हणाली. तेव्हां त्याचा नाइलाज झाला. शेवटीं ब्राह्मणाचा वेष घेतलेला अर्जुन पुढें झाला आणि त्यानें धनुष्य वांकवून तें निशाण तेव्हांच अचूक मारलें. लागलीच द्रौपदीनें त्याला माळ घातली. एका ब्राह्मणानें आपली अगदीं फजिती केली, असें पाहून सर्व जमलेले राजे अत्यंत खवळून गडबड करूं लागले. पण भीम व अर्जुन यांनीं सर्वांचा समाचार घेतला. त्यांच्यापुढें कोणाचें कांहीं चाललें नाहीं.

पुढें बिऱ्हाडीं गेल्यावर 'आई, ही पहा भिक्षा आणली आहे,' असें अर्जुन बाहेरूनच कुंतीला म्हणाला. तेव्हां पांचजणांनीं ती वांटून घ्या,' असें न पाहतां आंतूनच तिनें उत्तर दिलें. शेवटीं आपल्या आईचे हे शब्द खरे करण्याकरितां पांची जणांनीं तिच्याशीं लग्न लावावें, असें त्यांनीं आपसांत ठरविलें. व श्रीव्यासांचे सांगण्यावरून द्रुपद राजालाही ती गोष्ट मान्य झाली. मग पांच पांडवांशीं द्रौपदीचें विधीप्रमाणें लग्न झालें.

---

## पांडव हस्तिनापुराला परत येतात.



आपणांला वाटल्याप्रमाणें पांडव जळून मेले नसून ते जिवंत आहेत, असें कौरवांना कळतांच त्यांच्या जिवाला पुन्हा तळमळ लागली. पांडवांशीं उघड उघड युद्ध करून त्यांना मारून टाकावें, असा बेत कर्ण, शकुनि व दुर्योधन यांनीं आपसांत ठरविला. व धृतराष्ट्रापाशीं दुर्योधनानें तसें करण्याला परवानगी मागितली. धृतराष्ट्रानें, या वेळीं काय करावें, असें भीष्म, द्रोण व

विदुर यांना विचारलें. पांडवांना अर्धे राज्य देऊन हा तंटा कायमचा मिटवावा, असा पोक्त सल्ला त्या तिघांनीं दिला. धृतराष्ट्रालाही तो रुचला. त्याप्रमाणें त्यानें, पांडवांना आणण्या-साठीं विदुराला द्रुपदराजाकडे पाठविलें. कुंति, द्रौपदी, यांसह पांडवांना विदुरानें मोठ्या थाटानें हस्तिनापुरीं ( कौरवांची राजधानी ) आणलें. त्यांना पाहून सर्व लोकांना मोठा आनंद झाला. मग आपल्या पूर्वीच्या बेताप्रमाणें धृतराष्ट्रानें अर्धे राज्य पांडवांना दिलें. त्यांनीं इंद्रप्रस्थ येथें आपली राजधानी केली.

---

## अर्जुनाची तीर्थयात्रा.

द्रौपदी पांचा भावांची बायको झाली. पुढें नारदाच्या विचारानें त्यांनीं असें ठरविलें कीं, पांचांपैकीं कोणीही भाऊ तिच्याजवळ असतां दुसऱ्या कोणत्याही भावानें तेथें जाऊं नये. जर कोणी चुकून गेला, तर त्यानें घर सोडून बारा महिने बाहेर तीर्थयात्रा करीत हिंडावें. एके

दिवशीं असें झालें कीं, ‘ चोर माझ्या गाई चोरून नेत अहेत; धांवा ! हो धांवा ! ’ असें ओरडत एक ब्राह्मण राजवाड्यांत आला. तेव्हां अर्जुनानें त्या ब्राह्मणाला धीर दिला, आणि आपलीं शस्त्रास्त्रें घेण्याकरितां तो खोलींत गेला. तेथें धर्म व द्रौपदी हीं एके ठिकाणीं होतीं. अर्जुनानें आपलीं शस्त्रास्त्रें घेतलीं आणि ब्राह्मणाच्या गाई सोडविल्या. नंतर आपल्या हातून नियम मोडल्याचें जें पातक घडलें, त्याबद्दल ठरल्याप्रमाणें तो तीर्थयात्रा करण्याकरितां निघून गेला. **स्वतां दुःख सोसण्याची पाळी आली, तरी तें सोसून दुसऱ्याचें दुःख हलकें करण्याकरितां जो झटतो, तोच थोर होय. असेंच थोरपणाचें** आचरण या वेळीं अर्जुनानें केलें. असो. अनेक देश व अनेक तीर्थें फिरतां फिरतां तो गंगाद्वाराला येऊन पोहोंचला. तेथें नागराजाची कन्या उलूपी इजबरोबर त्यानें लग्न केलें. पुढें तो मणिपुराला गेला. तेथें राजकन्या चित्रांगदा इच्याशीं त्यानें विवाह केला. या चित्रांगदेपासून त्याला बभ्रुवाहन या नांवाचा एक मुलगा झाला. नंतर

गोकर्ण वगैरे अनेक तीर्थें पाहात पाहात तो प्रभासाला आला. तेथें श्रीकृष्णाची व त्याची भेट झाली. तेव्हां श्रीकृष्णानें त्याला द्वारकेला नेलें. श्रीकृष्णाची सुभद्रा म्हणून एक बहीण होती. ती दुर्योधनाला द्यावी, असें बळरामाच्या मनांत होतें. पण आपला विवाह अर्जुनाशींच व्हावा, असें सुभद्रेला मनांतून वाटत होतें. अखेरीस श्रीकृष्णानें मोठ्या युक्तीनें याच वेळीं सुभद्रा व अर्जुन यांचें लग्न जमवून आणलें. पुढें अर्जुनानें उरलेले दिवस पुष्कर वगैरे तीर्थें करण्यांत घालविले. आणि बारा महिने पुरे झाल्यावर तो सुभद्रेला घेऊन इंद्रप्रस्थाला आला. सुभद्रेला एक पुत्र झाला. त्याचें नांव अभिमन्यु असें होतें. हा मुलगा आपल्या बापासारखाच पराक्रमी होता. द्रौपदीलाही प्रत्येक पांडवापासून एक असे पांच पुत्र झाले.

---



## अर्जुनाला गांडीव धनुष्याची प्राप्ति.



याच सुमारास श्रीकृष्ण पांडवांना भेटण्यासाठीं इंद्रप्रस्थास आला. एके दिवशीं श्रीकृष्ण व अर्जुन हे यमुनेच्या कांठीं शिकार करीत असतां ब्राह्मणाचा वेष घेऊन अग्नि त्यांच्याकडे आला, आणि खांडववन खाण्यास मागूं लागला. त्या दोघांनीं अग्नीला ओळखलें आणि त्याच्या इच्छेप्रमाणें खांडववन देऊन त्याला तृप्त केलें. त्यामुळें अग्नीला संतोष झाला. आणि त्यानें त्या उपकाराची फेड करण्याकरितां एक अक्षय भाता (जींतले बाण कधींही संपावयाचे नाहींत, अशी एक बाणांची पिशवी), गांडीव नांवाचें एक उत्कृष्ट धनुष्य व दिव्य घोडे असलेला असा कपिध्वजरथ, अशा तीन वस्तु अर्जुनाला दिल्या; व सुदर्शन नांवाचें एक चक्र श्रीकृष्णाला दिलें.

---



# २ सभापर्व.



## मयसभा.

मय या नांवाचा एक राक्षस होता. खांडव-वन खाऊन टाकण्याला अर्जुनानें अग्नीला जेव्हां मदत केली, तेव्हां त्यानें या मयाचे प्राण वांचविले होते. या अर्जुनाच्या उपकाराची आपण कांहीं तरी फेड करावी, असें मयाचे मनांत आलें. तेव्हां आपली कांहीं तरी सेवा करण्याची माझी इच्छा आहे, तेवढी आपण पुरवावी, असें त्यानें अर्जुनाला सांगितलें. श्रीकृष्ण सांगेल तें काम कर, त्यांत मला संतोष आहे, असें त्यावर अर्जुनानें उत्तर दिलें. मय हा उत्तम कारागीर होता. तेव्हां त्याच्या या गुणाकडे लक्ष देऊन त्याला साजेल, असेंच एक काम श्रीकृष्णानें त्याच्यावर सोंपविलें. युधिष्ठिरासाठीं एक उत्तम सभागृह तयार करण्याला त्यानें त्याला सांगितलें. मयानेंही तें म्हणणें मान्य केलें. व सभागृहाला

लागणारी सामुग्री कैलासपर्वताच्या उत्तरभागांत आहे, असें त्याला ठाऊक असल्यामुळें तो ती आणण्याकरितां लागलाच तिकडे गेला. अनेक जातींचे बहुमोल दगड, जवाहीर, एक उत्तम गदा, देवदत्त नांवाचा एक शंख, असे जिन्नस त्यानें तिकडून आणले. ती गदा त्यानें भीमाला दिली; शंख अर्जुनाला दिला; व रत्नें वगैरे इतर जिन्नस सभामंदिराला लावले. हें मंदिर अत्यंत सुंदर होतें. त्याला ' मयसभा ' असें म्हणत.

---

## राजसूय यज्ञ.

मयसभा तयार झाली. पुढें कांहीं काळानें नारदमुनि पांडवांना भेटायला आले. राजसूय यज्ञ करण्याविषयीं स्वर्गांतून पांडुराजानें त्यांच्या-बरोबर युधिष्ठिराला निरोप पाठविला होता. श्रीकृष्ण व दुसरे अनेक शहाणे लोक यांचा विचार घेऊन त्या निरोपाप्रमाणें यज्ञ करण्याचा युधिष्ठिरानें निश्चय केला. पण जरासंध फार माजला आहे, तेव्हां त्याला पहिल्यानें मारावें,

आणि मग यज्ञाला आरंभ करावा, असा सल्ला श्रीकृष्णानें दिला. जरासंध हा मगध देशाचा राजा असून तो फार प्रबळ होऊन गर्वानें अगदीं चढून गेला होता. त्यानें शायशीं राजे बंदींत टाकले होते. व बंदिवान राजांची संख्या शंभर झाली, म्हणजे एक मोठा यज्ञ करून तो त्या सर्वांना बळी देणार होता. तेव्हां त्याला मारल्याशिवाय यज्ञ सुरळीतपणें तडीस जाण्याचा संभव नव्हता. म्हणून त्याला मारून व चारी दिशांच्या बाकी सर्व राजांना अगोदर जिंकून मग यज्ञ करावा, असें सर्वांनीं ठरविलें. त्याप्रमाणें श्रीकृष्ण, भीम व अर्जुन असे तिघे वेष पालटून जरासंधाकडे गेले. शेवटीं भीमानें त्याच्याशीं युद्ध करून त्याला मारून टाकलें. नंतर त्यांनीं जरासंधाचा मुलगा सहदेव यास त्याचे गादीवर बसविलें, सर्व राजांची कैदेंतून सुटका केली, यज्ञाला आम्ही सगळे मदत करूं असें वचन त्यांच्यापासून घेतलें, व पुष्कळ संपत्ति घेऊन ते इंद्रप्रस्थाला परत आले. नंतर भीम, अर्जुन, नकुल व सहदेव, असे चौघे भाऊ युधिष्ठिराची आज्ञा

घेऊन चारी दिशांच्या राजांना जिंकण्यासाठीं सैन्यांसह बाहेर पडले. चौघे चार दिशांना गेले. युधिष्ठिर राज्याची व्यवस्था पाहण्यासाठीं घरींच राहिला. चौघांनींही सर्व राजांना जिंकून पुष्कळ द्रव्य आणिलें.

नंतर युधिष्ठिर आपल्या भावांसह यज्ञाच्या तयारीला लागला. लवकरच सर्व तयारी झाली. विद्वान् ब्राह्मण, राजे, ठळक ठळक वैश्य व शूद्र यांना आमंत्रणें देण्यासाठीं सहदेवानें जिकडे तिकडे दूत रवाना केले. भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, विदुर व नात्याचीं इतर माणसें यांना बोलावणें करण्याकरितां नकुल स्वतां गेला. बोलावण्याप्रमाणें एकंदर सर्व मंडळी आली. यज्ञांत एकेका माणसाकडे, एकेक काम सोंपवून दिलें होतें. सर्वांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था दु:शासनाकडे, ब्राह्मणांचा सत्कार करण्याचें काम अश्वत्थाम्याकडे, राजांचा मानमरातब ठेवण्याचें काम संजयाकडे, ब्राह्मणांना दक्षिणा वांटण्याचें काम कृपाचार्यांकडे, नजराणे घेण्याचें काम दुर्योधनाकडे, एकंदर खर्चाचें काम विदुराकडे, याप्रमाणें कोणाकडे

कांहीं, कोणाकडे कांहीं, अशीं कामें वांटून दिलीं होतीं. ब्राह्मणाचे पाय धुण्याचें काम श्रीकृष्णानें उचललें होतें. व एकंदर व्यवस्थेवर नजर ठेवून कमीज्यास्ती पाहण्याचें काम भीष्म व द्रोण हे करीत होते.

याप्रमाणें यज्ञ समाप्त झाला. ब्राह्मण तृप्त झाले. बाकी सगळ्यांनाही आनंद झाला. पण इतक्यांत थोडा विरस होण्यासारखी एक गोष्ट घडून आली. यज्ञाचे शेवटीं जमलेल्या मंडळीची संभावना ( पूजा, मान ) सुरू झाली. तेव्हां पूजेचा पहिला मान कोणाला द्यावा, असा प्रश्न आला. भीष्माच्या विचारानें हा श्रीकृष्णाला द्यावा, असें ठरलें. व एका शिशुपालाशिवाय सर्वांना तो बेत पसंतही पडला. त्याप्रमाणें श्रीकृष्णाची प्रथम संभावना झाली. शिशुपालाला तें अगदीं कडू लागलें. त्याला आपला अगदीं अपमान झाला, असें वाटलें. तेव्हां तो संतापला, व अगदीं गुरकावून तंट्याला उभा राहिला. भीष्म, युधिष्ठिर व श्रीकृष्ण यांच्यावर त्यानें हवें तसें तोंड सोडलें. पुष्कळांनीं त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न

केला. कांहीं केल्या तो म्हणून ऐकेना. तेव्हां श्रीकृष्णाला त्याचा विचार करावा लागला. खरें म्हटलें म्हणजे, शिशुपाल हा श्रीकृष्णाचा आतेभाऊच होता. यापूर्वी श्रीकृष्णाचे त्यानें पुष्कळ अपराध केले होते. पण तुझ्या पुत्राचे शंभर अपराध मी पोटांत घालीन, असें वचन श्रीकृष्णानें आपल्या आतेला म्हणजे शिशुपालाचे आईला दिलें होतें. त्यामुळें शंभर अपराध होतपर्यंत तो त्याला कांहीं बोलला नाहीं. इतके अपराध आपण याचे पोटांत घातले, तरी याची दुष्ट खोड अद्याप जात नाहीं, असें पाहून व आपल्या आतेला दिलेल्या वचनांतून आपण आतां मोकळे झालों आहों, असा विचार करून श्रीकृष्णानें आपलें सुदर्शन चक्र शिशुपालावर सोडलें. त्या चक्रानें त्याचें डोकें उडविलें. नंतर श्रीकृष्णानें त्याच्या मुलाला त्याच्या गादीवर बसविलें. आतां यज्ञ अगदीं पुरा झाला. यज्ञाकरितां जमलेले राजे आपापल्या देशाला परत गेले. हा यज्ञ शेवटास गेल्यानें युधिष्ठिर सार्वभौम राजा झाला; व सुखानें आपलें राज्य करूं लागला. पण

लवकरच तुमच्यांत कलह लागून तो चांगलाच विकोपास जाणार आहे, असें श्रीव्यासांनीं त्याला सुचाविल्यामुळें त्याचें मन अगदीं उदास होऊन गेलें.

---

## दुर्योधनाचा मत्सर.

मयानें जें सभामंदिर बांधिलें होतें, तें खरोखरच अद्‌भुत होतें. त्यांतले सगळे प्रकार दृष्टीला अगदीं फसविणारे होते. राजसूययज्ञ संपल्यावर दुर्योधन शकुनीसह त्या मयसभेचा थाट पहात पहात फिरत असतां, कोठें पाणी समजून कपडे सांवरून तो जपून चालूं लागे, तों तो धाडकन खालीं आपटे. कोठें जमीन समजून निर्धास्त चालला असतां तो पाण्यांत पडून त्याचे कपडे भिजत. दार आहे, असें समजून तो जों आंत शिरूं लागे, तों भिंतीला त्याचें कपाळ आपटून त्याला टेंगूळ येई. त्या सभागृहांत जिथे तिथे त्याची अशी अगदीं फजिती फजिती झाली. फजितीच्या दुःखापेक्षां ती आपली फजिती दुसऱ्यांनीं पाहिली, तर मनुष्याला दुःख

ज्यास्त होतें. तसेंच दुर्योधनाचें झालें. त्याची जिथे जिथे फजिती होई, तिथे तिथे भीम, द्रौपदी, पांडवांचीं चाकर-माणसें, वगैरे त्याला हंसत. आधीं पांडवांचें हें वैभव पाहून दुर्योधन मत्सरानें अगदीं वेडा होऊन गेला होता; त्यांत त्याची सर्वांदेखत अशी फजिती झाली. मग काय विचारतां! तो अगदीं चिडून गेला. व या सगळ्याचें उट्टें काढण्याचा त्यानें निश्चय केला. नंतर तो हस्तिनापुराला आला. पण त्याला दुसरें कांहीं सुचेना. तो अगदीं झुरणीला लागला. कारण सरळ रीतीनें पाडवांना जिंकतां येईल, असें कांहीं त्याला वाटेना. शेवटीं कपटानें पांडवांचें सर्व वैभव हरण करावें, असा बेत शकुनीच्या विचारानें त्यानें ठरविला. शकुनि द्यूत खेळण्यांत मोठा पटाईत होता. तेव्हां धर्माला द्यूत खेळायला लावून फसवावें, असा विचार त्यांनीं केला. युधिष्ठिर खरा क्षत्रिय असल्यामुळें त्याला द्यूत खेळायाला बोलाविलें, तर तो नाहीं म्हणणार नाहीं, अशी त्यांची खात्री होती. मग ही गोष्ट दुर्योधनानें धृतराष्ट्राच्या

कानांवर घातली; पण ती त्याला आवडली नाहीं. मत्सरानें मनुष्याला कधींही सुख होत नाहीं. शेवटीं त्यानें त्याचा नाश होतो. बळवानाबरोबर भांडणें बरें नाहीं. वैरापासून कधीं कोणाचें कल्याण होत नाहीं. असा पुष्कळ उपदेश धृतराष्ट्रानें दुर्योधनाला केला. पण उपड्या घड्यावर पाणी ! दुर्योधनाचा हट्ट सुटेना. विनाश-काळ आला, म्हणजे विपरीत बुद्धि होते, असें म्हणतात. तसेंच त्याचें झालें. शेवटीं कांहीं उपाय चालत नाहीं, असें पाहून धृतराष्ट्रानें द्यूताला आपली संमति दिली, व पांडवांना घेऊन येण्यासाठीं त्यानें विदुराला इंद्रप्रस्थास पाठविलें.

---

## द्यूत.

—:०:—

द्यूताला कोणीं बोलावलें असतां मागें घ्यावयाचें नाहीं, असा युधिष्ठिराचा नियम असल्यामुळें तो आपल्या सर्व मंडळीसह हस्तिनापुराला आला. तेथें सभेंत द्यूताला सुरवात झाली. प्रत्येक डाव युधिष्ठिराचे अंगावर येऊं लागला. राज्य,

दास, दासी, भाऊ, आपण स्वतः, हीं सर्व पणास लावून त्यानें घालविलीं. शेवटीं त्यानें द्रौपदीला पणास लाविलें. पण तोही डाव तो हरला. हा प्रकार पाहून सज्जनांचे तोंडांतून 'धिक्कार! धिक्कार ! ! ' असे शब्द आपोआप बाहेर पडले. भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य, यांच्या अंगांना दरदरून घाम सुटला. व विदुरानें लज्जेनें खालीं मान घातली. असो.

कौरवांनामात्र अतिशय आनंद झाला. त्या आनंदानें धुंद होऊन द्रौपदीचा भरसभेमध्यें छळ करावा, व अशा रीतीनें पांडवांच्या दुःखा-वर आणखी डागण्या द्याव्या, असें त्यांनीं मनांत आणिलें. त्याप्रमाणें दुर्योधनानें द्रौपदीला सभेंत आणण्यासाठीं एका दूताला पाठविलें. परंतु कांहीं तरी सबब सांगून त्याला तिनें परत धाडलें. तेव्हां, तूं जाऊन तिला घेऊन ये, असें दुर्यो-धनानें दुःशासनाला सांगितलें. तो तिला आणण्या-साठीं गेला. पण ती येण्याला आढेवेढे घेऊं लागली. तेव्हां तिचे केंस धरून त्या दुष्टानें तिला फरफरां ओढीत सभेंत आणलें. त्या वेळेस

तिच्या अंगावर फक्त एक नेसूचें तेवढें वस्त्र होतें. सभेंत आणल्यावर द्रौपदीनें आपल्या पतींकडे रागानें व लज्जेनें एकदां पाहिलें. तिची ती केविलवाणी मुद्रा पाहून कोणी तरी आपलें काळीज अगदीं चिरून टाकावें, असें त्यांना दुःख झालें! इतक्यांत या दास पांडवांचीं वस्त्रें व या दासी द्रौपदीचेंही वस्त्र हिसकून घे, असें दुर्योधन म्हणाला. त्याबरोबर पांडवांनीं आपलीं वस्त्रें फेकून दिलीं व ते उघडे बसले. आणि दुःशासन साध्वी द्रौपदीचें वस्त्र ओढून फेडूं लागला! द्रौपदीनें हंबरडा फोडला! कोणी तिचें रक्षण करण्याला पुढें होईना! 'कृष्णा! या वेळीं तूं तरी धांवत येऊन माझी लाज राख!' असा तिनें शेवटीं श्रीकृष्णाचा धांवा केला. द्रौपदीचा तो हंबरडा ऐकून पांडवांना तर अगदीं मरणप्राय दुःख झालें! पण बिचारे काय करणार! ते स्वतांच दास होऊन गेल्यामुळें त्यांचा कांहीं उपाय चालण्यासारखा नव्हता. हा भयंकर प्रकार पाहून राज्यावर कांहीं तरी अनर्थ कोसळणार, असें सर्व विचारी लोकांना खास



दुःशासन द्रौपदीचें वस्त्र फेडूं लागला !

[ पृ० ४२.

वाटलें. असो. श्रीकृष्णानें गुप्तपणें द्रौपदीला वस्त्रें पुरविलीं. तिचें शरीर सभेंत उघडें होऊं नये, अशी जिथे श्रीकृष्णानें व्यवस्था केली, तिथे दुःशासन बिचारा किती वस्त्रें फेडणार! अखेरीस तो ओशाळून थांबला! इतक्यांत होमशाळेंत कोल्हे ओरडूं लागले.! व गाढवांनीं त्यांना उत्तर दिलें. हें दुश्चिन्ह पाहून धृतराष्ट्र घाबरून द्रौपदीला म्हणाला, " तुझ्यावर मी संतुष्ट झालों आहें. तुला पाहिजेत ते तीन वर माग. " याप्रमाणें तिनें एका वरानें युधिष्ठिराची सुटका केली; व दुसऱ्यानें बाकीच्या पांडवांची केली. तिसरा वर माग, असें जेव्हां धृतराष्ट्र म्हणाला, तेव्हां तिनें असें उत्तर दिलें कीं, क्षत्रियांनीं तिसरा वर मागूं नये. पांडवांची सुटका झाली, एवढें मला पुरे आहे. ते पराक्रमी आहेत. सुटका झाल्यावर वाटेल तें मिळविण्याचें सामर्थ्य त्यांचे अंगीं आहे. तेव्हां तिसरा वर मी मागत नाहीं. तेव्हां धृतराष्ट्रानें सर्वांना दासपणांतून मुक्त केलें. आणि ते आपल्या राजधानीला परत जाऊं लागले. आपला सगळा बेत फसला, असें पाहून

दुर्योधनाला पुन्हा तळमळ लागली. युधिष्ठिराला पुन्हा द्यूत खेळायला बोलवावें, असें कर्ण व शकुनि यांच्या विचारानें त्यानें ठरविलें, व धृतराष्ट्राजवळ जाऊन तसें करण्याला तो परवानगी मागूं लागला. जो या डावांत हरेल, त्यानें बारा वर्षें वनवास व एक वर्ष आपल्याच योग्यतेच्या माणसांत राहून आज्ञातवास काढावा; व या आज्ञातवासांत असतां जर तो उमगला, तर त्यानें फिरून बारा वर्षें वनवास करावा। अशी पैज आम्ही या वेळीं लावणार आहों, असेंही त्यानें धृतराष्ट्राला सांगितलें. हें ऐकून धृतराष्ट्रानें पुन्हा खेळण्याला परवानगी दिली. युधिष्ठिर आला. व पुन्हा खेळ सुरू झाला. शकुनीनें या वेळींही डाव जिंकला. झालें. द्रौपदीसह सर्व पांडवांवर वनवासाला जाण्याची पाळी आली. त्याप्रमाणें आपली आई कुंति व विदुर यांचा निरोप घेऊन व आपल्या अंगावरील अलंकार व उंची वस्त्रें हीं काढून ठेवून ते वनांत जायला निघाले.

बोलूं नयेत असे शब्द द्रौपदीला बोलून दुःशासनानें जेव्हां तिच्या लुगड्याला हात

घातला, तेव्हां भीमानें अशी प्रतिज्ञा केली होती कीं, या पापी व कुळाला कलंक लावणाऱ्या दुष्टाचा ऊर फोडून मी जर याचें रक्त प्यालों नाहीं, तर मला नरकाची प्राप्ति होवो. त्याचप्रमाणें दुर्योधनाची मांडी आपल्या गदेनें फोडून टाकण्याचाही त्यानें निश्चय केला होता. ज्या वेळीं भीमानें या प्रतिज्ञा केल्या, त्याच वेळीं अर्जुनानें कर्णाला, सहदेवानें शकुनीला, व नकुलानें बाकीच्या कित्येक कौरवांना मारण्याची प्रतिज्ञा केली होती.

——



# ३ वनपर्व.

—:०:—

पांडव वनांत जाऊं लागले, तेव्हां राज्यांतले पुष्कळ लोक त्यांच्या मागोमाग जाण्यास तयार झाले. कारण दुष्ट कौरवांच्या राज्यांत राहण्यापेक्षां धर्मानें वागणाऱ्या पांडवांबरोबर वनांत राहणें बरें, असें त्यांना वाटलें. तुम्ही या राज्यांतच राहाल, तर मला अधिक संतोष वाटेल, असें जेव्हां युधिष्ठिरानें त्यांना सांगितलें, तेव्हां बरेच लोक मागें फिरले. तरी कित्येक ब्राह्मण परत जाण्याचें कबूल करीतना. आम्ही तुम्हांला सोडून जाणार नाहीं, असें त्यांनीं साफ सांगितलें. तेव्हां युधिष्ठिराचा इलाज खुंटला. पण अरण्यांत आपल्याच पोटाची पंचाईत, तेव्हां या ब्राह्मणांना खायला काय घालावें, ही त्याला मोठी काळजी पडली. त्यानें शेवटीं धौम्यांना उपाय विचारला. तूं सूर्याची प्रार्थना कर, म्हणजे तो तुझी काळजी दूर करील, असें त्यांनीं सुच-

विलें. त्याप्रमाणें त्यानें तप केलें. सूर्यानें संतुष्ट होऊन व प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याला एक तांब्याची स्थाली ( पात्र ) दिली. ‘ तयार केलेलें अन्न हींत घालून जोंपर्यंत द्रौपदी वाढील, तोंपर्यंत तें अन्न कधींही कमी पडणार नाहीं, ’ असें सूर्यानें सांगितलें. त्यामुळें युधिष्ठिराची एक मोठी काळजी दूर झाली. द्रौपदीचें सर्वांचे मागून जेवण झालें, कीं ती स्थाली रिकामी होई! पुढें पांडव काम्यक नांवाच्या वनांत येऊन राहिले.

या काम्यक वनांत किर्मीर नांवाचा एक मोठा राक्षस असे. तो बकाचा भाऊ व हिडिंबाचा मित्र होता. पांडव तेथें येऊन राहिल्यावर आपल्या भावाच्या व मित्राच्या वधाबद्दल सूड घेण्याकरितां तो भीमाच्या अंगावर धांवून आला. बराच वेळ दोघांचें भयंकर युद्ध झालें. शेवटीं भीमानें त्याला जमिनीवर आपटून मारलें.

पांडवांना आपण वनांत पाठविलें, तेव्हां प्रजेचा आपल्यावर राग होईल, अशी धृतराष्ट्रास धास्ती पडली. तेव्हां, प्रजेची आमच्यावर भक्ति बसण्याला काय उपाय करावा, असें त्यानें विदु-

रास विचारलें. दुर्योधनास बंदींत टाकावें, व युधिष्ठिरास वनांतून परत आणून त्यास राज्य द्यावें, असें विदुरानें त्यावर अगदीं खरें खरें उत्तर दिलें. पण **जें खरें असतें, तें नेहमीं माणसाला कडू लागतें.** धृतराष्ट्राला हें विदुराचें उत्तर तसेंच कडू लागलें. तो विदुराला पुष्कळ टाकून बोलला. तूं आपल्या आवडत्या पांडवां-कडे जा, असेंही त्यानें त्याला सांगितलें. तेव्हां विदुर मुकाट्यानें हस्तिनापुर सोडून पांडवांकडे आला. पण विदुरासारखा शहाणा मनुष्य जर पांडवांना मिळाला, तर त्यांचें वैभव वाढेल. हें बरें नाहीं. असें धृतराष्ट्राला वाटलें. व तूं गेल्या-पासून मला झोंपही धड येत नाहीं, असा लबा-डीचा निरोप पाठवून त्यानें विदुरास परत आणविलें. इकडे कर्ण, शकुनि, दुर्योधन व दुःशासन यांनीं वनांत जाऊन पांडवांना मारण्याचा बेत केला. त्याप्रमाणें ते निघालेही. पण श्रीव्या-सांनीं हा बेत आपल्या ज्ञानानें जाणला. मग त्यांनीं वाटेंतच त्यांना गांठलें व असला दुष्ट विचार तुम्ही सोडून द्या, तेणेंकरून तुमचाच

नाश होईल, असें सांगून त्यांना मागें परतविलें. इतक्यांत, पांडवांची वनांतील स्थित पाहून व त्यांचे तोंडून सर्व हकीगत ऐकून मैत्रेय ऋषि धृतराष्ट्राकडे आले. व कौरवाचे दुष्टपणासंबंधानें त्यांनीं त्याची चांगली कानउघाडणी केली. दुर्योधनालाही त्यांनीं चार उपदेशाचे शब्द सांगितले. पण तो तोंडानें कांहींच बोलला नाहीं. नुसता हंसला, व पायाचे बोटानें भुई उकरीत त्यानें आपले मांडीवर थाप मारली. तेव्हां, हीच तुझी मांडी भीम गदेनें मोडून टाकील, असा यांनीं रागानें दुर्योधनास शाप दिला.

कौरवांनीं पांडवांचें सगळें द्यूतांत हरण करून घेऊन त्यांना वनांत पाठविलें; ही हकीकत ऐकून कुंतीच्या माहेरचीं माणसें, द्रुपदराजाकडील माणसें, यादव व श्रीकृष्ण अशी मंडळी काम्यकवनांत त्यांच्या समाचारास आली. त्यांना पाहून द्रौपदीच्या शोकाला भरती आली. तेव्हां श्रीकृष्णानें तिचें समाधान केलें. नंतर सुभद्रा व अभिमन्यु यांना बरोबर घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस गेला. धृष्टद्युम्न आपल्या बहिणीच्या म्हणजे द्रौपदीच्या

पांची मुलांना घेऊन आपल्या नगराला गेला. समाचारास आलेली मंडळी याप्रमाणें आपापल्या देशीं निघून गेल्यावर पांडव काम्यक-वन सोडून द्वैतवनांत येऊन राहिले.

## अस्त्रं मिळविण्याकरितां अर्जुन स्वर्गी जातो.



द्वैतवनांत आल्यानंतर एके दिवशीं संध्या-कालीं सर्व पांडव एके ठिकाणीं बोलत बसले असता, द्रौपदीचे मनांत डांचत असलेलें दुःख ती धर्माला सांगू लागली. ती म्हणाली, "कौरवांनीं माझा इतका छळ केला; आपल्यासारख्या राजपुत्रांना व माझ्यासारख्या राजकन्येला वनांत पाठविलें; हें पाहून तुम्हांला संताप कसा येत नाहीं म्हणत्यें मी? असें मृग गिळून बसणें क्षत्रियांना शोभतें का?" यावर युधिष्ठिरानें असें उत्तर दिलें कीं, "**मनुष्य रागाच्या स्वाधीन झाला, कीं त्याचा नाश होतो. क्षमेसारखें मनुष्याला शोभा देणारें दुसरें कांहीं नाहीं.**

एकानें जरा वाईट केलें, कीं दुसऱ्यानें लागलेंच त्याचें उलट वाईट करायचें, अशी वागणूक जर प्रत्येक मनुष्य जगांत करूं लागला, तर कसें चालेल ? सर्व चांगले गुण क्षमेच्याच आश्र-यानें राहतात." पण अशा प्रकारच्या भाष-णानें द्रौपदीचें थोडेंच समाधान होणार होतें ! ती रागानें म्हणाली, "पण परमेश्वराचे घरीं न्याय आहे कोठें ? जो धर्मानें वागतो, त्याला परमेश्वर दुःखांत ठेवतो, व जो अधर्मानें वागतो, तो सुखांत लोळत असतो." त्यावर धर्म म्हणाला, "आपण माणसें अज्ञान आहों. आप-ल्याला त्या परमेश्वराचे हेतु कांहीं कळत नाहींत. त्याच्याविषयीं आपण असें भलतें-सलतें बोलूं नये. कांहीं झालें तरी आपण धर्म सोडूं नये. धर्मानें वागणें एवढेंच आपलें काम आहे. चांगलें फळ मिळालें, तरच धर्माप्रमाणें वागावयाचें. असें म्हणणारे खरे धार्मिक नव्हत. ते एक प्रकारचे व्यापारी झाले." धर्मानें इतकें समजावून सांगितलें, तरी द्रौपदीचा हट्ट सुटेना ! कौरवांची खोड मोडून

आपलें राज्य परत घ्या, तेव्हांच माझा जीव शांत होईल, असा तिनें आग्रह धरिला. इतक्यांत भीमाचें तोंड सुरू झालें. तोही धर्माला अगदीं दोष देऊं लागला. भीमाचें तें कडक भाषण ऐकून युधिष्ठिराला फारच वाईट वाटलें. तरी जी गोष्ट एकदां कबूल केली, ती मी कधींही मोडणार नाहीं; मी बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञात-वास करीन; मग काय होईल तें होईल, असें त्यानें स्पष्ट उत्तर दिलें. इतक्यांत श्रीव्यास तेथें आले; व ' प्रतिस्मृति ' नांवाची विद्या धर्मराजास शिकवून ते म्हणाले, " ही विद्या तूं अर्जुनास शिकीव. नंतर इंद्रापासून दिव्य अस्त्रें मिळवून आणण्यासाठीं त्याला पाठव. तीं अस्त्रें त्याला मिळालीं म्हणजे तेरा वर्षें भरल्यावर तुम्हांला कौरवांना सहज जिंततां येईल." असें बोलून त्यांनीं अर्जुनाला असें सांगितलें कीं, देवांनीं, वृत्रासुराच्या भीतीनें आपलीं सगळीं अस्त्रें इंद्राजवळ ठेविलीं आहेत. तेव्हां तपश्चर्येनें त्याला तूं प्रसन्न कर, म्हणजे तुला तीं मिळतील. कौरवांचा नाश करणें जरी कठिण आहे, तरी तीं

अस्त्रें मिळाल्यावर तें काम तुझ्या हातून होईल. नंतर ते निघून गेले. पुढें पांडव पुन्हा काम्यक-वनांत परत आले.

नंतर धर्मानें अर्जुनाला अस्त्रें आणण्यासाठीं पाठविलें. हिमालय व गंधमादन हे पर्वत ओलांडून तो इंद्रकीलनामक पर्वतावर आला. व तेथें तप करूं लागला. तेव्हां इंद्र एका तपस्व्याचें रूप घेऊन आला व तुला काय पाहिजे, असें अर्जुनास म्हणाला. अर्जुनानें दिव्य अस्त्रें मागितलीं. यावर इंद्र म्हणाला, " स्वर्ग मागावयाचें सोडून तूं अस्त्रें मागतोस, हें काय ? " तेव्हां अर्जुनानें उत्तर दिलें, " माझ्या भावांनीं मला अस्त्रांकरितांच पाठविलें आहे. ते संकटांत असतां मला एकट्याला स्वर्ग काय करावयाचा ? ज्यांनीं त्यांना दुःखांत लोटलें आहे, त्यांचा सूड मला घ्यावयाचा आहे. म्हणून मला अस्त्रेंच पाहिजे आहेत. " महादेवाला तूं संतुष्ट कर; मग मी तुला माझीं अस्त्रें शिकवीन; असें सांगून इंद्र गुप्त झाला.

त्याप्रमाणें हिमालयावर जाऊन अर्जुनानें तपाला आरंभ केला. चार महिने तप झाल्यावर अर्जुनाची परीक्षा पाहण्याचा शंकरानें विचार केला. एक दिवस एक रानडुकर अर्जुनाचे अंगावर चालून आला. अर्जुनानें त्याच्यावर बाण टाकला. त्याच वेळेस शंकरानें किराताचे ( पारध्याचे ) रूपानें येऊन दुसऱ्या बाजूनें त्या डुकराचे अंगावर बाण सोडला. दोघांचेही बाण एकदम लागून तो डुकर पडला. पण ही शिकार कोणाची याविषयीं दोघांत भांडण जुंपलें. बोलाचाली होतां होतां दोघे हातघाईवर आले. दोघांचें युद्ध जुंपलें. तेव्हां अर्जुनाचें शौर्य व धैर्य पाहून शंकर संतुष्ट झाला. व त्यानें आपलें पाशुपत नांवाचें अस्त्र त्याला दिलें. इतक्यांत इंद्राचा सारथी मातली रथ घेऊन तेथें आला. व इंद्राचा निरोप सांगून अर्जुनाला इंद्रलोकीं घेऊन गेला. तेथें पांच वर्षें राहून इंद्रापासून सर्व अस्त्रें त्यानें मिळविलीं.

---



दोघांचेही बाण एकदम लागून तो डुकर पडला. [पृ० ५४.

## पांडवांची तीर्थयात्रा.



अर्जुन गेल्यास फार दिवस झाले, त्याचा कांहींच समाचार कळेना, म्हणून पांडव व द्रौपदी काळजींत होतीं. इतक्यांत लोमश ऋषि इंद्राकडून तेथें आले. अर्जुन खुशाल आहे, अस्त्रें शिकून तो लवकरच परत येईल. तोंपर्यंत तुम्ही तीर्थयात्रा कराव्या; म्हणजे पुढें होणाऱ्या युद्धांत तुम्हांला जय मिळेल. असा इंद्राचा निरोप त्यांनीं पांडवांना कळविला. तो ऐकून सर्वांना मोठा आनंद झाला. नंतर पांडव तीर्थ-यात्रेला निघाले. बरोबर लोमश व इतर ऋषि हे होतेच. अनेक तीर्थें व पुण्यस्थानें पाहात पाहात ते बदरिकाश्रमास आले. तेथें असतां एक दिवस असें झालें कीं, हजार पाकळ्यांचें एक सुंदर कमल ईशान्य दिशेकडून वाऱ्याबरोबर वाहात येऊन ते ज्या आश्रमांत उतरले होते, त्या आश्रमाजवळ पडलें. तें कमल फार गोंडस असून त्याचा वास फारच मधुर होता. तेव्हां तसलीं आणखी कांहीं कमळें द्रौपदीस हवींशीं वाटलीं;

म्हणून तीं आणण्यासाठीं भीम ईशान्येस निघाला. जातां जातां वाटेंत त्याची व मारुतीची गांठ पडली. या भेटीनें दोघांना आनंद झाला. मारुतीनें प्रसन्न होऊन भीमास दोन वर दिले; व कुबेराच्या सौगंधिक वनाचा मार्ग त्याला दाखवून तो गुप्त झाला. याच सौगंधिक वनांत एका लहानशा तळ्यांत तीं कमळें होतीं. यक्ष व राक्षस तेथें पाहरा करीत होते. ते भीमाला कमळें घेऊं देईनात. तेव्हां भीमानें आपल्या गदेनें त्या सर्वांचा समाचार घेतला. भीमाचेमागोमाग बाकीचे पांडव व द्रौपदी हीं तेथें आलीं. कुबेरानेंही त्यांना तेथें राहण्याची परवानगी दिली. नंतर तेथें कांहीं दिवस राहून तीं पुन्हा बदरिकाश्रमीं आलीं. तेथें भीमानें जटासुर नांवाच्या एका राक्षसाचा वध केला. पुन्हा कांहीं इकडे तिकडे प्रवास करून पांडव गंधमादन पर्वतावर येऊन राहिले. येथें ते असतांना अर्जुन परत आला. पांडवांना अत्यानंद झाला. तेथून ते हिंडत हिंडत द्वैतवनांत आले. तेथें पावसाळा संपेपर्यंत राहून ते काम्यकवनांत

आले. तेथें श्रीकृष्ण येऊन त्यांना भेटला. तो युधिष्ठिराची परीक्षा पाहण्यासाठीं म्हणाला कीं, आम्ही यादव तुजकरितां आज कौरवांशीं युद्ध करितों. व तुझें राज्य तुला मिळवून देतों. पण युधिष्ठिरानें त्याला असें साफ उत्तर दिलें कीं, आम्हांस सत्याचा मार्ग सोडतां येत नाहीं. आमची सर्व भिस्त तुजवरच आहे. पण तेरा वर्षें भरण्यापूर्वीं आमचें राज्य आम्हांला नको. इतक्यांत मार्कंडेय ऋषि तेथें आले. ते बरेच दिवस तेथें राहिले. व त्यांनीं पांडवांना पुष्कळ बोध केला. त्याचा सारांश असा:—

---

## मार्कंडेयांचा बोध.



केवळ शरीराच्या सुखाकडे जो पाहतो, त्याला दुःखेंच भोगावीं लागतात. त्याची बुद्धि भ्रष्ट होते. मनुष्य जसें कर्म करितो, तसें त्याला फळ मिळतें. चांगल्या कर्माचें फळ चांगलें, वाईटाचें वाईट. हातून घडलेल्या कर्माचें

फळ भोगल्याशिवाय मनुष्याला सुटका नाहीं, म्हणून खऱ्या मार्गानें चालावें. सर्वांशीं नम्रतेनें वागावें. सर्व प्राण्यांवर दया करावी. प्रजेचें उत्तम रक्षण करावें. तिला नेहमीं संतुष्ट ठेवावें. तसेंच देव व पितर यांना संतोष होईल, अशींच कर्में करावीं. लोकांचे चांगले गुण असतील ते घ्यावे, वाईट असतील ते सोडून द्यावे. **गर्वाची सावलीसुद्धां घेऊं नये. मनुष्याचें मन हें फार उनाड आहे.** त्याला नेहमीं आपल्या स्वाधीन ठेविलें पाहिजे. म्हणजे तें शुद्ध राहतें. **जोंपर्यंत मन पवित्र नाहीं, तोंपर्यंत कितीही धार्मिक कर्में केलीं, तरी तीं फुकट आहेत.** मनानें, वाचेनें किंवा शरीरानें कोणतेंही पाप होतां कामा नये. तरच उपयोग आहे. **सत्य हाच खरा धर्म आहे.** जो निरंतर धर्मानें वागतो, चांगल्या मार्गानें पैसा मिळवितो, व दुसऱ्यांचें होईल तेवढें बरें करितो, त्यालाच या लोकीं व परलोकीं सुख मिळतें. पण याच्या उलट जो वागतो, त्याला कोठेंच सुख मिळत नाहीं.

---

## द्रौपदी व सत्यभामा यांचा संवाद.



श्रीकृष्ण पांडवांना भेटायला आला, तेव्हां सत्यभामाही त्याच्याबरोबर आली होती. ती एक दिवस बोलतां बोलतां द्रौपदीला म्हणाली, " तूं आपल्या पांच नवऱ्यांना अगदीं मुठींत कसें बाई ठेविलें आहेस? ते कधींच तुझ्यावर रागावत नाहींत. असा काय मंत्रतंत्र तूं केला आहेस, तो तरी मला सांग. म्हणजे मीही कृष्णाला आपल्या मुठींत ठेवीन." यावर द्रौपदी म्हणाली, " ज्या कजाग बायका असतात, त्या मंत्रतंत्र करितात. मला कांहीं ती वाट माहीत नाहीं. पण तूं शहाणी आहेस, तुला असें विचारणेंच शोभत नाहीं. आपली बायको मंत्रतंत्राच्या नादीं लागली आहे, असें नवऱ्याला कळलें, तर तो बिचारा सापासारखा तिला भीत असतो. त्याच्या जिवाला मग मुळींच शांतता वाटत नाहीं. आणि शांतता नाहीं तर सुख कुठलें? मंत्रानें का कुठे नवरे स्वाधीन होतात? बायको या नादाला लागली, म्हणजे तिच्या नवऱ्याच्या शत्रूंनामात्र चांगलें

फावतें. ते औषध म्हणून नवऱ्याचे अंगाला चोपडण्याकरितां तिला विष देतात. तेणेंकरून नवऱ्याला अनेक रोग जडतात. मी आपल्या पतींशीं कशी वागत्यें तें ऐक. मी त्यांच्या मनांविरुद्ध कांहीं करीत नाहीं. आपला राग, लोभ बाजूला ठेवून मी त्यांची मनापासून सेवा करत्यें. सवतींवर देखील मी अगदीं प्रेम करत्यें. भलतें बोलणें, भलतीकडे बसणें, भलतीकडे बघणें, भलतीकडे जाणें, ग्रांतलें मी कांहीं करीत नाहीं. दुसऱ्या पुरुषाकडे मी पहातही नाहीं. मग तो कोणी कां असेना. ते जेवल्याशिवाय मी जवीत नाहीं. त्यांची आंघोळ झाल्याशिवाय आंग धूत नाहीं. कीं ते निजल्याशिवाय निजत नाहीं. ते बाहेरून आले कीं, उठून मी उभी राहत्यें, त्यांना पाय धुवायला पाणी देत्यें व बसायला आसन देत्यें. वेळच्या वेळीं चांगलें जेवण करून त्यांना घालत्यें. घर झाडून-सारवून नेहमीं स्वच्छ ठेवत्यें. व घरांतल्या सामानाला अगदीं जिवापलीकडे जपत्यें. तोंडांतून वाईट शब्द कधीं काढीत नाहीं, व वाईट बायकांची सावलीसुद्धां घेत नाहीं.

आंगांत आळस अगदीं ठेवींत नाहीं. उगीच फिदीफिदी हासणें, दारांत उभें राहणें, इकडे तिकडे मौजा मारणें, या गोष्टी मी टाळत्यें. पति घरीं नसले, तर दागदागिने मी आंगावर घालींत नाहीं. ते जें खातपीत नाहींत, त्याला मीही शिवत नाहीं. **आमचे जे कुळाचार आहेत, ते जसे सासुबाईंनीं मला सांगितले आहेत, तसे मी पाळत्यें.** सासूबाईंची व्यवस्था मी नीट ठेवत्यें. त्यांच्या शब्दाबाहेर वागत नाहीं. त्यांच्यापेक्षां उंची लुगडें किंवा मोठे दागिने कधींही वापरींत नाहीं. किंवा त्यांना तोडून कधीं बोलत नाहीं. नोकरांचाकरांच्या खाण्यापिण्याची नीट चौकशी करत्यें. त्यांच्या कामांवरही नीट नजर ठेवत्यें. जमा काय, खर्च काय, याची सगळी माहिती मलाच असते. मी सगळा तो पाहत्यें. यामुळ माझ्या पतींला आपल्या उद्योगाकडे लक्ष द्यायला मिळतें. **स्त्रियांचा पति हाच धर्म. पति हाच देव.** म्हणून त्यांच्या सेवेंत मी रात्रंदिवस चूर असत्यें. त्यांच्या मागून निजत्यें. व अगोदर उठत्यें. सत्यभामे, हेंच माझें मंत्रतंत्र.

पतीचें मन आपल्याकडे ओढून घेण्याला हा एव-ढाच मार्ग आहे. पतीचा आनंद आपण ठेवला, तर आपल्या सगळ्या इच्छा पुरतात, व त्याचा राग झाला, तर आपला नाश होतो. कष्ट सोसले, तर सुख मिळतें. सुखानें तें कधीं मिळत नाहीं. प्रेमानें कृष्णाची सेवा कर. वेळेला दासी नसली, तर तिचें काम तूंच स्वतां कर. हिचा अगदीं आपल्यावर जीव आहे, असें त्याला वाटूं दे. त्यानें तुझ्याजवळ एखादी गोष्ट सांगितली असली, तर ती अगदीं बाहेर फोडूं नको. त्यानें पुष्कळ वेळा मोठा घात होतो. पतीच्या मित्रांना संतुष्ट ठेव, व त्याच्या शत्रूंपासून दूर रहा. चांगल्या स्त्रियांची नेहमीं संगति ठेव. कजाग, खादाड, चोरट्या, चहाडखोर, अशा दुष्ट बाय-कांशीं संबंधसुद्धां ठेवूं नको. अशी वागलीस, तर केवढें तुझें भाग्य होईल म्हणून सांगूं!" हें द्रौपदीचें बोलणें ऐकून सत्यभामेला फारच आनंद झाला.

---

## दुर्योधनाचा हिरमोड.



पांडव वनवासांत हाल भोगीत आहेत, तेव्हां तेथें जाऊन व आपलें वैभव दाखवून त्यांना लाजवावें, व त्यांच्या दुःखावर डागण्या द्याव्या, अशी मसलत कर्ण व शकुनि यांनीं काढली, व दुर्योधनालाही ती पसंत पडली. त्याप्रमाणें कांहीं सैन्य, भाऊ व घरांतील स्त्रिया यांना बरोबर घेऊन दुर्योधन द्वैतवनांत आला. तिथे कांहीं कारणावरून गंधर्वांची व त्यांची लढाई जुंपली. तींत कौरवांचा पराभव होऊन स्त्रियांसह ते सगळे गंधर्वांचे हातीं सांपडले. कर्णमात्र निसटून गेला. गंधर्व त्यांना घेऊन जाऊं लागले. इकडे युद्धांतून जीव घेऊन पळालेले कौरवांचे कांहीं लोक युधिष्ठिराला शरण गेले. व कौरवांना सोडवून कुरुकुळाची लाज राखा, अशी त्यांनीं युधिष्ठिराची प्रार्थना केली. तेव्हां भीम आनंदानें म्हणाला, " परभारें तिसऱ्यानेंच आमच्या शत्रूंचें काम काढलें. फार चांगली गोष्ट झाली. " पण धर्माला हें बोलणें रुचलें नाहीं.

तो म्हणाला, " असें बोलूं नको. त्यांचें आमचें जरी भांडण असलें, तरी तें या वेळीं मनांत आणावयाचें नाहीं. आपसांत भांडण असेल, तेव्हां ते शंभर व आपण पांच. पण तिसऱ्याशीं तंटा असेल, तेव्हां आपण एकशें-पांच." याप्रमाणें बोध करून कौरवांस सोडवून आणण्यासाठीं त्यानें आपल्या भावांस पाठविलें. त्यांनीं पराक्रमानें त्यांची सुटका केली, व त्यांना युधिष्ठिरासमोर आणलें. ' असा अविचारीपणा पुन्हा करूं नको. अविचारी पुरुषांना कधींही सुख होत नाहीं.' असें सांगून दुर्योधनाला त्यानें निरोप दिला.

आपण करायला गेलों एक, व झालें भलतेंच, असें पाहून दुर्योधनाला अगदीं मेल्यापेक्षां मेलें झालें. ही त्याची झालेली फजिती त्याच्या मनास फार बोंचूं लागली. तो अगदीं जीव देण्याला तयार झाला. इतक्यांत वाटेंतच कर्णाची गांठ पडली. दुःशासन, शकुनि, कर्ण, यांनीं त्याची कशीबशी समजूत घातली. तेव्हां तो हस्तनापुरास परत आला. नंतर दुर्यो-

धनाची आज्ञा घेऊन कर्णानें दिग्विजय केला. व शेवटीं दुर्योधनाची चिंता घालविण्याकरितां, अर्जुनाचा मी वध करितों, अशी त्यानें प्रतिज्ञा केली.

---

## दुर्वास ऋषींची फजिती.

पुढें एके दिवशीं दुर्वास ऋषि आपल्या सर्व शिष्यांसह दुर्योधनाचे दरबारीं आले. तेव्हां दुर्योधनानें त्यांचा उत्तम सत्कार केला. तेणेंकरून दुर्वास संतुष्ट झाले व त्यांनीं त्याला, पाहिजे तो वर माग, म्हणून सांगितलें. तेव्हां, ' द्रौपदीचें जेवण होऊन स्थाली रिकामी पडल्यावर आपण आपल्या सर्व शिष्यांसह पांडवांकडे भोजनास जावें, ' असा वर त्यानें मागितला. व दुर्वासांनीं तें त्याचें मागणें कबूल केलें. त्याप्रमाणें, एके दिवशीं सर्व ब्राह्मण व पांडव यांचीं भोजनें होऊन द्रौपदीचेंही जेवण झालें; आणि सूर्यानें दिलेली स्थाली रिकामी पडली. इतक्यांत दुर्वास ऋषि आपल्या हजारों शिष्यांसह अकस्मात् तेथें येऊन

' भोजन पाहिजे ' असें म्हणाले. युधिष्ठिरानें त्यांना नदीवर जाऊन स्नान करून येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते नदीवर गेले. आपलें आतां सत्त्व जातें, असें वाटून द्रौपदीनें श्रीकृष्णाचा धांवा केला. आपल्या खऱ्या भक्ताचें कोठेंच उणें पडूं द्यावयाचें नाहीं, हा भगवान् श्रीकृष्णाचा बाणा असल्यामुळें तो लागलाच धांवत आला, व मला भूक फार लागली आहे, कांहीं तरी खायाला दे, असें द्रौपदीला म्हणाला. माझें जेवण होऊन स्थाली रिकामी पडली आहे. आतां तुला खायला देण्यास कांहीं नाहीं. असें तिनें लाजून उत्तर दिलें. थट्टा करूं नको. मला फारच भूक लागली आहे. लवकर स्थाली आण पाहूं. असें श्रीकृष्ण म्हणाला. द्रौपदीनें स्थाली आणली. तिच्या गळ्याला भाजीचें एक पान चिकटलेलें त्याला दिसलें. तेवढेंच त्यानें प्रेमानें खाल्लें व ढेंकर दिली. त्याच्या भुकेची तृप्ति झाली. नंतर, नदीवर जाऊन ऋषींना भोजनाकरितां बोलावून आण, असें त्यानें सहदेवास सांगितलें. इकडे असा चमत्कार झाला कीं,

ते ऋषि स्नान करून नदींतून वर येतात तों उत्तम पक्वान्नांचें भोजन केल्याप्रमाणें त्यांना ढेंकरा येऊं लागल्या. जेवणाची अगदीं इच्छा उरली नाहीं. तेव्हां, पांडव मोठे भक्त आहेत, त्यांचें सत्त्व घेण्याचा आपण उद्योग केला, याबद्दल आपलें काय होईल कांहीं कळत नाहीं, असें दुर्वासांना भय पडलें, व ते तेथूनच परभारें शिष्यांसह पळून गेले. नंतर सहदेवाला कांहीं ब्राह्मणांचे सांगण्यावरून सर्व हकीकत समजली. ती त्यानें परत येऊन पांडवांस सांगितली. अशा रीतीनें दुर्योधनाचा डाव फसला व दुर्वासांचीही फजिती झाली. परमेश्वर ज्याची पाठ राखतो, त्याची फजिती कोण करणार ?

---

## जयद्रथाची फजिती.

पुढें एके दिवशीं द्रौपदीला तृणबिंदु ऋषींच्या आश्रमांत ठेवून पांडव शिकारीकरितां अरण्यांत गेले. आश्रमांत द्रौपदी एकटीच होती. इतक्यांत सिंधु देशाचा राजा व दुर्योधनाचा मेहुणा

जयद्रथ सैन्यासह तेथें येऊन उतरला. द्रौपदी सहज त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तिच्याशीं तो पुष्कळ चावटपणाचीं बोलणीं बोलूं लागला. शेवटीं जबरीनें तिला रथांत घालून तो निघाला. ती आक्रोश करूं लागली. तो ऐकून धौम्य-ऋषि तेथें आले. व त्याची निंदा करीत त्याचे रथाचेमागून धांवूं लागले. इतक्यांत पांडवही परत आले, तों रडत असलेली द्रौपदीची दासी त्यांना वाटेंतच भेटली. तिनें त्यांना सगळी हकीगत सांगितली. तेव्हां ते जयद्रथाचे पाठो-पाठ निघाले. त्यांना दूर पाहातांच जयद्रथ घाबरला, व द्रौपदीला रथाखालीं सोडून पळून जाऊं लागला. शेवटीं भीम व अर्जुन या दोघांनीं त्याला पकडून व चांगला फजित करून युधि-ष्ठिराकडे आणलें. युधिष्ठिरानें त्याला क्षमा करून सोडून दिलें. पण झालेल्या प्रकाराबद्दल जयद्र-थास फार वाईट वाटलें. व पांडवांचा नाश करण्याचें सामर्थ्य अंगीं यावें म्हणून तो गंगा-द्वारीं जाऊन उग्र तप करूं लागला. त्या तपानें प्रसन्न होऊन, अर्जुन दुसरीकडे असतांना एक

दिवस तूं बाकीच्या पांडवांचा पराभव करशील, असा शंकरानें त्याला वर दिला.

---

## कर्णाचा उदारपणा.



इंद्रानें अर्जुनास दिव्य अस्त्रें दिल्यामुळें पांडवांना आतां शत्रूची भीति उरली नव्हती. पण कर्णाला आंगचींच कवच-कुंडलें होतीं. त्यांच्या योगानें त्याच्या शरीराला बाण किंवा कोणतेंही शस्त्र यानें अपाय होत नसे. यामुळें त्याला मारणें मोठें कठिण काम होतें. तेवढीं कवच-कुंडलें जर कर्णापासून काढून घेतलीं, तर पांडवांचें बहुतेक काम होईल, असें इंद्राला वाटून हरप्रयत्नानें तीं त्याजपासून घेण्याचा त्यानें निश्चय केला. कारण इंद्राला पांडवांचें हित करावयाचें होतें. त्यांतले त्यांत अर्जुन हा त्याचा अंश असल्यामुळें त्याचा त्याला बचाव करावयाचा होता. अर्जुनाच्या वधाची कर्णानें प्रतिज्ञा केली होती, हें मागें सांगितलेंच आहे. कर्ण हा मोठा उदार होता. जो कोणी जें कांहीं मागेल तें त्यास नाहीं

म्हणावयाचें नाहीं, असा त्याचा नियम होता. यामुळें त्याचीं कवच-कुंडलें सहज घेतां येतील, असें इंद्रास वाटलें. त्याप्रमाणें ब्राह्मणाचे रूपानें येऊन त्यानें कर्णाजवळ तीं मागितलीं. कर्णानेंही उदारपणानें तीं त्याला दिलीं. मात्र उलट इंद्रापासून त्यानें एक शक्ति मागून घेतली. नंतर इंद्र संतुष्ट होऊन निघून गेला. कवच-कुंडलें जाऊन कर्णाचें बळ कमी झालें आहे, हें ऐकून कौरवांना फार दुःख झालें व पांडवांना अर्थात् अतिशय आनंद झाला.

---

## यमाची भेट.

पांडव वनांत राहून अनेक प्रकारचीं संकटें भोगतां भोगतां त्यांचीं वनवासाचीं बारा वर्षें भरत आलीं. बारावें वर्ष संपण्यास थोडे दिवस उरले, तेव्हां पांडव काम्यकवन सोडून पुन्हा द्वैतवनांत आले. तेथें एके दिवशीं कांहीं कामाकरितां अरण्यांत फिरत असतां ते थकून एका झाडाखालीं बसले. त्या सर्वांना तहान लागली

होती. तेव्हां युधिष्ठिरानें नकुलाला कोठून तरी पाणी शोधून आणण्यास सांगितलें. नकुल पाण्याचा शोध करीत निघाला. लवकरच त्याला एक स्वच्छ पाण्याचें सुंदर सरोवर दिसलें. त्यांतील पाणी पिण्यासाठीं तो जाऊं लागला; तोंच, ‘ अरे, असा अविचार करूं नको. या सरोवरावर माझी सत्ता आहे. अगोदर माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे आणि मग पाण्याला हात लाव. ’ असे शब्द त्यास ऐकूं आले. तिकडे लक्ष न देतां नकुल पाणी प्याला; तेव्हां तो तत्काळ तेथेंच मरून पडला. नकुल येत नाहीं, असें पाहून युधिष्ठिरानें सहदेवाला तिकडे पाठविलें. त्याचीही नकुलाप्रमाणेंच स्थिति होऊन तोही मरून पडला ! नंतर धर्मराजानें क्रमानें अर्जुन व भीम यांना पाठविलें. त्यांचीही अवस्था तीच झाली ! आपण पाठविलेले आपले चारही भाऊ अजून येत नाहींत, असें पाहून युधिष्ठिर स्वतः त्या सरोवरावर आला. तों तेथें आपले चौघे भाऊ मरून पडलेले पाहून त्यास अतिशय दुःख व आश्चर्य वाटलें. त्यानें पुष्कळ शोक

केला. शेवटीं तहान अतिशय लागल्यामुळें तोही पाणी पिण्यास गेला. तोंच त्याच्यापुढें एक बक-पक्षी आला व म्हणाला, ' माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे आणि मग पाणी पी. नाहीं तर तुझे हे चार भाऊ पडले आहेत, तसाच तूं पांचवा पडशील. ' मी तुझ्या प्रश्नांचीं माझ्या शक्तीप्रमाणें उत्तरें देतों, विचार, असें युधिष्ठिरानें उत्तर केलें. मग त्यानें तें बगळ्याचें रूप टाकून यक्षाचें रूप घेतलें. नंतर त्यानें त्याला अनेक प्रश्न विचारले. त्यांचीं धर्मानें बरोबर उत्तरें दिलीं. त्यांनीं संतुष्ट होऊन त्यानें धर्माच्या चौघांही भावांना जिवंत केलें. आपण यक्ष नसून प्रत्यक्ष यमधर्म आहों, असें शेवटीं त्यानें पांडवांस कळविलें. तेव्हां युधिष्ठिरानें त्याच्यापासून असा वर मागून घेतला कीं, अज्ञातवासाच्या काळांत आम्हांस कोणीं ओळखूं नये. तो वर त्याला देऊन व अज्ञातवासाचें वर्ष विराटराजाचे नगरांत राहून काढा, असें पांडवांस सांगून यमधर्म गुप्त झाला.

---

## यक्षप्रश्न.



त्या यक्षानें युधिष्ठिराला अनेक प्रश्न विचारले, हें वर सांगितलेंच आहे. ते प्रश्न व धर्मानें दिलेलीं त्यांचीं उत्तरें हीं फार बोधपर आहेत. म्हणून त्यांतील कांहीं प्रश्नोत्तरें पुढें दिलीं आहेत:—

| प्रश्न. | उत्तर. |
| --- | --- |
| पृथ्वीपेक्षां थोर कोण? | माता. |
| आकाशापेक्षां उंच कोण? | पिता. |
| रोग्याचा मित्र कोण? | वैद्य. |
| गृहस्थाचा मित्र कोण? | भार्या. |
| थंडीचें औषध काय? | अग्नि. |
| मरणाऱ्याचा मित्र कोण? | दान. |
| वायूपेक्षां चंचळ कोण? | मन. |
| तृणापेक्षां पुष्कळ काय? | चिंता. |
| विद्वान् कशानें होतो? | शास्त्रानें. |
| शहाणपण कशानें येतें? | वृद्धांच्या सहवासानें. |
| जिवंत असून मेला कोण? | देव, अतिथि, आप्त, वडील, यांस |

| | |
|---|---|
| | संतुष्ट ठेवीत नाहीं तो. |
| सनातन धर्म कोणता? | जो मोक्ष देतो तो. |
| कीर्ति कशानें मिळते? | उदारपणानें. |
| स्वर्ग कशानें मिळतो? | सत्यानें. |
| मनुष्याचें उपजीवन काय? | पर्जन्य. |
| कोणतें कृत्य करणें अगदीं जरूर आहे? | दान. |
| धन मिळविण्यास मुख्य साधन कोण तें | दक्षता. |
| धनांत श्रेष्ठ धन कोण | विद्याधन. |
| उत्तम लाभ कोणता? | आरोग्यलाभ. |
| उत्तम सुख कोणतें? | संतोष. |
| मुख्य धर्म कोणता? | दया. |
| काय केलें असतां दुःख होत नाहीं? | मनाचा निग्रह. |
| कोणाची मैत्री कमी होत नाहीं? | साधूंची. |
| काय टाकल्यानें मनुष्य सर्वांना आवडता होतो? | अभिमान. |

| | |
|---|---|
| काय टाकल्यानें सुख होतें? | लोभ. |
| सगळे लोक कशानें भरलेले आहेत? | अज्ञानानें. |
| मेलेला पुरुष कोण? | दरिद्री. |
| विष कोणतें? | याचना. |
| तप म्हणजे काय? | स्वधर्मानें वागणें. |
| दम म्हणजे काय? | मनाचा निग्रह. |
| लाज कशाची धरावी? | वाईट कामाची. |
| ज्ञान म्हणजे काय? | परमेश्वराचें स्वरूप जाणणें. |
| शम म्हणजे काय? | चित्ताची शांति. |
| दया म्हणजे काय? | सर्वांस सुख व्हावें असें इच्छिणें. |
| सरळपणा म्हणजे काय? | सर्वांवर सारखेंच प्रेम करणें. |
| मोठा रोग कोणता? | लोभ. |
| साधु कोण? | सगळ्यांचें हित करितो तो. |
| आळस कोणता? | शास्त्रांप्रमाणें आचरण न करणें. |

| | |
|---|---|
| शोक कोणता? | अज्ञान. |
| स्थैर्य कोणतें? | स्वधर्माचे ठिकाणीं दृढता. |
| धैर्य म्हणजे काय? | इंद्रियांचा निग्रह. |
| स्नान कोणतें? | मनाचा मळ धुऊन टाकणें. |
| दान म्हणजे काय? | प्राण्यांचें रक्षण करणें. |
| पंडित कोण? | धर्म जाणतो तो. |
| मूर्ख कोण? | देव नाहीं, असें म्हणणारा. |
| काम म्हणजे काय? | संसारसुखाची इच्छा. |
| मत्सर कोणता? | मनाचा संताप. |
| अहंकार म्हणजे काय? | मोठें अज्ञान. |
| दंभ म्हणजे काय? | धर्माचा बाहेरून डौल करणें. |
| दैव म्हणजे काय? | जसें दिलें असेल, तसें प्राप्त होणें. |
| पैशुन्य म्हणजे काय? | दुसऱ्यांची निंदा. |
| अक्षय नरकांत कोण जातो? | जवळ पैसा असून |

| | |
|---|---|
| | जो गरिबांस देत नाहीं, त्याचा उपयोग करीत नाहीं व माझ्याजवळ कांहीं नाहीं असें सांगतो तो. |
| सगळ्यांशीं जो प्रेमानें गोड बोलतो त्यास काय लाभ होतो ? | तो सगळ्यांचा आवडता होतो. |
| जो विचार करून काम करितो त्याला नेहमीं काय मिळतें ? | जय. |
| पुष्कळ मित्र असल्यास काय मिळतें ? | तो सुखानें राहतो. |
| धर्मानें वागतो त्यास काय मिळतें? | मोक्ष. |
| आश्चर्य कोणतें ? | रोज प्राणी मरतांना दिसत असून आपल्याला मरायचें आहे, हें कोणी लक्षांत धरीत नाहीं. |

मार्ग कोणता? ज्या मार्गानें थोर लोक जातात तो.

---

# ४ विराटपर्व.



होतां होतां पांडवांच्या वनवासाचीं बारा वर्षें संपलीं. उरलेलें अज्ञातवासाचें तेरावें वर्ष मत्स्य देशांत विराटराजाचे नगरींत निरनिराळ्या वेषांनीं राहून घालविण्याचें त्यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें विराटनगराजवळ येऊन ते पोहोंचले. नगरांत जाण्यापूर्वी आपलीं सर्व शस्त्रास्त्रें त्यांनीं एके ठिकाणीं बांधलीं, व नगराबाहेरच्या स्मशानाजवळील एका मोठ्या शमीवृक्षाच्या ढोलींत ठेविलीं; व तेथें कोणीं जाऊं नये, म्हणून एक प्रेत त्या झाडाचे फांदीस टांगून ठेविलें. नंतर ते विराटाचे नगरांत आले. पहिल्यानें युधिष्ठिर ब्राह्मणाच्या वेषानें येऊन म्हणाला, ' मी युधिष्ठिराचा मित्र आहें. माझें नांव कंक. मला द्यूतविद्या उत्तम येते. ' तेव्हां विराटानें त्याला दरबारीं ठेवून घेतलें. नंतर भीम जाऊन म्हणाला,

' मी बल्लव नांवाचा आचारी आहें. स्वयंपाकाचें कांम मला उत्तम करितां येतें. मी युधिष्ठिराचे पदरीं होतों. मल्लविद्याही मी चांगली जाणतों.' विराटानें त्यालांही आश्रय दिला व त्याला आपल्या मुदपाकखान्यावर मुख्य नेमिलें. पुढें द्रौपदी विराटाची राणी सुदेष्णा इजकडे जाऊन म्हणाली, ' मी सैरंध्री ( दासी ) आहें. मी पूर्वी श्रीकृष्णाची पत्नी सत्यभामा व पांडवांची भार्या द्रौपदी यांच्या आश्रयास होत्यें. पांच गंधर्व माझे पति असून ते माझें संतत गुप्तरूपानें रक्षण करीत असतात.' मी कोणाचें उष्टें खाणार नाहीं व कोणाचे पाय धुणार नाहीं, असेंही तिनें तिला सांगितलें. हें ऐकून सुदेष्णेनें तिला आपली दासी म्हणून जवळ ठेविलें. नंतर स्त्रीवेषानें अर्जुन आला. गाणें, नाचणें, वाजविणें, वगैरे कला मला चांगल्या येत आहेत, असें त्यान सांगितल्या-वरून विराटराजानें त्याला आपली मुलगी उत्तरा हिला या कला शिकविण्यास ठेविलें. अर्जुनानें बृहन्नडा असें नांव घेतलें होतें. नकुल ग्रंथिक असें नांव घेऊन आला व मला अश्वविद्या उत्तम

येते, असें त्यानें सांगितलें. मी गोविद्या चांगली जाणतों व माझें नांव तंतिपाल आहे, असें सह-देवानें येऊन सांगितलें. तेव्हां विराटानें सहदे-वास गोपालांचा व नकुलास पागेचा मुख्य अधिकारी नेमिलें.

---

## कीचकवध.



पांडव व द्रौपदी हीं विराटाच्या पदरीं राहून केवळ चाकराचीं कामें करीत असतां दहा महिने लोटले व अज्ञातवासाचे फक्त दोन महिने उरले. पण तितक्यांतही त्यांचेवर एक मोठें संकट आलें. राणी सुदेष्णा हिचा कीचक नांवाचा एक मानलेला भाऊ होता. तो मोठा पराक्रमी व शूर असून तो विराटाचा सेनापति होता. त्यानें एकदां राजवाड्यांत सहज द्रौपदीस पाहिलें. तेव्हां तूं माझी भार्या हो, असें निर्लज्जपणानें तो तिला म्हणाला. ती अर्थात् त्याचें म्हणणें ऐकेना. एक दिवस त्या दुष्टापासून आपलें रक्षण करण्याकरितां

ती राजसभेंत धांवत गेली. तिचे पाठोपाठ तो गेला. शेवटीं तिला गांठून त्या चांडाळानें भर-सभेंत तिला लाथ मारिली. भीमाला तें सहन झालें नाहीं. तो कीचकाला मारण्याकरितां उठला. इतक्यांत युधिष्ठिरानें त्याला दाबलें. ही इशारत मिळतांच मोठ्या कष्टानें आपला राग आवरून भीमसेन तेथून निघून गेला. द्रौपदी तर करुण-स्वरानें आक्रोश करूं लागली. तिची दाद घेण्याच्याऐवजीं सभेंतील लोक वाष्कळ भाषणें बोलूं लागले. हें पाहून तिचें समाधान करण्या-साठीं युधिष्ठिर म्हणाला, सैरंध्री, तूं आतां येथें उभी राहूं नको. राणीच्या महालांत जा. तुझे गंधर्वपति या वेळीं तुझें रक्षण करण्यास आले नाहींत; यावरून सूड उगविण्याची ही वेळ नाहीं, असें त्यांस वाटलें असावें. ज्यानें तुला लाथ मारली, त्याचें पारिपत्य तुझे पति योग्य वेळीं करतील. पण तूं येथें क्षणभरही राहूं नको. तेव्हां द्रौपदी तेथून निघून गेली. पुढें तिनें लवकरच भीमाला एकांतीं गांठलें व आपल्या दुःखाची एकंदर कहाणी त्याला सांगून फारच शोक केला.

तेव्हां कीचकाला मी मारतों, असें त्यानें तिला वचन दिलें. व कांहीं युक्तीनें कीचकाला रात्रीच्या वेळीं नृत्यशाळेंत गांठून भीमानें त्याला ठार मारलें. व, माझा छळ करणाऱ्या कीचकाला माझ्या गंधर्वपतींनीं ठार केलें, असा सैरंध्रीनें चोहोंकडे बोभाटा केल्यामुळें दुसऱ्या कोणाचाच लोकांना संशय आला नाहीं. पण या सैरंध्री-मुळेंच कीचक मेला, असें त्याच्या भाऊबंदांना वाटलें. व त्यांनीं तिला जिवंत जाळण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें ते तिला जाळण्याला नेत असतां भीमानें वेष पालटून त्या सर्वांना ठार केलें. अशा रीतीनें द्रौपदीमुळें इतके लोक मेलेले पाहून विराटही घाबरला. आणि, तुझ्या-मुळें आमचा सगळ्यांचा नाश होईल, तेव्हां तूं आमच्या राज्यांत राहूं नको, ताबडतोब निघून जा, असें त्यानें सुदेष्णेकडून द्रौपदीला कळविलें. तेव्हां, मला आणखी तेरा दिवस राजवाड्यांत राहूं द्या, मग माझे पति मला घेऊन जातील व आपले उपकारही ते ठेवणार नाहींत, असें द्रौप-दीनें मोठ्या आर्जवानें सांगितल्यामुळें सुदेष्णेनें तिला राहण्याची परवानगी दिली.

## उत्तरगोग्रहण.



पांडवांच्या अज्ञातवासास प्रारंभ झाल्यापासून, त्यांचा शोध लावून त्यांना पुन्हा बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावयास लावण्यासाठीं दुर्योधनानें अनेक दूत चोहींकडे पाठविले होते. त्यांनीं पुष्कळ शोध केला; तरी कोणासही त्यांचा पत्ता लागला नाहीं. कीचक व त्याचे एकशेंपांच भाऊबंद यांचा गंधर्वांनीं वध केल्याची बातमीमात्र दूतांनीं दुर्योधनास कळविली. या कीचकानें त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा याचा अनेक वेळा युद्धांत पराभव केला होता; कीचकाच्या वधाची बातमी जेव्हां त्याला कळली, तेव्हां ही संधी साधून त्रिगर्त व कौरव यांनीं एक होऊन मत्स्य देशावर स्वारी करावी व दोघांनीं तें राज्य वांटून घ्यावें, अशी मसलत सुशर्म्यानें काढली. दुर्योधनालाही ती पसंत पडली. सुशर्म्यानें दक्षिणेकडून व कौरवांनीं उत्तरेकडून मत्स्य देशावर स्वाऱ्या कराव्या, असें त्यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें दक्षिणेकडून पहि-

त्यानें सुशर्म्यानें स्वारी केली. ही बातमी विराटास कळतांच तोही सैन्य घेऊन युद्धाला आला. अर्जुनाशिवाय बाकीच्या पांडवांनाही त्यानें आपलेबरोबर आणलें होतें. दोन सैन्यांचें मोठें तुंबळ युद्ध झालें. पण शेवटीं विराट शत्रूचे हातीं सांपडला. तेव्हां युधिष्ठिराला स्वस्थ बसवेना! विराटाचे आपलेवर उपकार आहेत; यावेळीं त्याची सुटका केली नाहीं, तर आपले पदरीं बेइमानीपणाचा दोष येतो, असें त्याला वाटलें. तेव्हां विराटाची सुटका करण्याविषयीं त्यानें आपल्या भावांस सुचविलें. मग काय विचारतां! त्यांनीं तेव्हांच सुशर्म्याचा पाठलाग केला. भीमानें शत्रूच्या सर्व सैन्याचा विध्वंस करून विराटाची सुटका केली. तेव्हां त्याला अत्यानंद झाला व त्यानें पांडवांचे फार आभार मानले.

इकडे ही गडबड चालली आहे, तोंच कौरवांनीं उत्तरेच्या बाजूनें येऊन विराटाच्या साठ हजार गाई पळविल्या. मुख्य गोपानें येऊन हें वर्तमान राजवाड्यांत सांगितलें. विराट आपल्या

सैन्यासह उत्तरेकडे युद्धांत गुंतल्यामुळें कौरवांचा समाचार घेण्याला जाण्यास वाड्यांत कोणी नव्हतें. राजपुत्र उत्तर हामात्र तेथें होता. कौरवांनीं गाई नेल्याची बातमी त्याला कळतांच तो मोठ्या ऐटीनें म्हणाला, काय करूं ? या वेळीं मला जर कोणी उत्तम सारथी मिळता, तर मीं तेव्हांच गाई सोडवून आणिल्या असत्या ! कौरव तर काय, पण प्रत्यक्ष अर्जुन जरी असला, तरी त्याचाही पराभव करून मी गाई परत आणतों ! कोणी तरी एक उत्तम सारथी पहा म्हणजे झालें ! शेवटीं द्रौपदीच्या सूचनेवरून बृहन्नडेला म्हणजे अर्जुनाला आपला सारथी करून व थोडेसें सैन्य बरोबर घेऊन तो कौरवांवर चाल करून गेला.

नगराबाहेर बऱ्याच अंतरावर रथ आल्यानंतर कौरवसेनेचा अफाट देखावा दिसूं लागला. द्रौपदीचा छळ करणाऱ्या आपल्या दुष्ट शत्रूंना समोर पाहून अर्जुनाला अगदीं त्वेष चढला. पण कौरवांची ती अफाट सेना पुढें पाहून उत्तराचें धाबें अगदीं दणाणून गेलें ! घरीं बायकांत मार-

लेल्या शूरपणाच्या त्याच्या गप्पा कुठच्या कुठे जिरून गेल्या. व रथ घेऊन तूं परत नगरांत चल, अशीं तो बृहन्नडेचीं अगदीं आर्जवें करूं लागला. बृहन्नडेनें त्याला हुरूप आणण्याकरितां आपलेकडून पुष्कळ प्रयत्न केला. पण कांहीं जुळेना. बृहन्नडा आपलें ऐकत नाहीं, असें पाहून उत्तर रथांतून उडी टाकून पायींच नगराकडे पळत सुटला! बृहन्नडेनें धांवत जाऊन त्याला धरलें. पण, या वेळीं मला तूं सोड, अशी तो तिची अगदीं पायधरणी करूं लागला. पण बृहन्नडेनें उचलून त्याला बळेंच रथांत घातलें, व तुला युद्ध करावयाचें नसेल, तर तूं माझा सारथी हो, मी युद्ध करीन, पण असा भिऊन पळूं नको, असें तिनें त्याला सांगितलें. तेव्हां त्याला कोठें थोडासा धीर आला. मग बृहन्नडेनें नगराबाहेरील स्मशानाकडे आपला रथ फिरविला. तेथें आल्यावर शमीच्या वृक्षावरचीं आपलीं शस्त्रें तिनें उत्तराकडून काढविलीं. हीं कोणाचीं, असें जेव्हां उत्तरानें विचारलें, तेव्हां, अज्ञातवासाची मुदत संपलेली आहे, असें जाणून

तिनें आपलें खरें नांव त्याला सांगून आपले भाऊ व द्रौपदी हीं कोणत्या वेषांत व कोठें आहेत, हेंही त्याला कळविलें. मग बृहन्नडा आपला स्त्रीवेष उतरून अर्जुन बनली. नंतर अर्जुनानें आपलें गांडीव धनुष्य सज्ज केलें; व मोठ्या हर्षानें त्याचा टणत्कार करून त्यानें सर्व दिशा दणाणून सोडल्या ! मग तो रथांत बसला. उत्तरानें रथ चालू करतांच अर्जुनानें आपला देवदत्त शंख जोरानें फुंकला. शंखाचा तो प्रचंड ध्वनि व धनुष्याचा टणत्कार हीं ऐकून हा अर्जुनच येत आहे, अशी कौरवांची खात्री झाली. व अज्ञातवासाचें वर्ष संपण्यापूर्वींच हा बाहेर आला आहे, तेव्हां पांडवांनीं पुन्हा बारा वर्षें वनवास केला पाहिजे, अशी चर्चा कौरवांत सुरू झाली. भांडण अगदीं निकरावर आलें. शेवटीं, पांडवांचें अज्ञातवासाचें वर्ष भरून गेलें आहे, अशी भीष्मानें सर्वांची खात्री केली. इतक्यांत अर्जुनाचा रथ कौरवांचे सैन्याजवळ येऊन थडकला. जोराचें युद्ध सुरू झालें. कर्ण, कृपाचार्य, द्रोणाचार्य, हे मोठमोठे वीर अर्जुनाशीं

युद्ध करून थकले. इतक्यांत अश्वत्थामा पुढें आला. त्यालाही त्यानें जीव घेऊन पळायला लावलें. कर्ण पुन्हा आला, पण लवकरच त्याला मागें व्हावें लागलें. मग भीष्म व अर्जुन यांचें युद्ध जुंपलें. दोघांनींही आपल्या पराक्रमाची शिकस्त केली. शेवटीं अर्जुनाचे बाणानें भीष्म रथांत बेशुद्ध पडला. तेव्हां सारथ्यानें त्याचा रथ बाजूस नेला. दुर्योधन, दुःशासन, विकर्ण वगैरे कौरवांबरोबरही अर्जुनाचें युद्ध झालें. पण त्यांचाही त्यानें पराभव केला. कोणत्याही एकट्या वीरास तो आटपत नाहीं असें पाहून सर्व कौरव एकदम त्याचे अंगावर चाल करून गेले. पण एक अस्त्र सोडून त्यानें सर्वांना जागचे जागीं बेशुद्ध पाडलें. याप्रमाणें आपल्या पराक्रमाची व अस्त्रविद्येची कौरवांना थोडी चुणूक दाखवून व विराटाच्या गाई सोडवून अर्जुन परत फिरला. घडलेला सर्व प्रकार गुप्त राख, असें उत्तरास बजावून तो रथ घेऊन स्मशानाजवळ आला, व आपलीं शस्त्रें शमीच्या ढोलींत ठेवून त्यानें पुन्हा स्त्रीवेष धारण केला. नंतर ते दोघे नगराकडे येण्यास निघाले.

इकडे विराट पांडवांमुळें जय मिळवून परत आला. तेव्हां बृहन्नडेला घेऊन उत्तर कौरवांशीं युद्ध करण्याकरितां गेला आहे, असें ऐकून त्याला उत्तराविषयीं फार भीति वाटली. तो त्याच्या मदतीला सैन्यही पाठविणार होता; पण इतक्यांत उत्तर विजयी होऊन परत निघाल्याचें वर्तमान त्याला कळलें. तेव्हां त्याला मोठा आनंद व कौतुक वाटलें. पुढें कंकाशीं ( युधिष्ठिराशीं ) द्यूत खेळत असतां विराट आपल्या पुत्राच्या पराक्रमाची मोठी फुशारकी मारूं लागला. तेव्हां कंक म्हणाला, ' ज्याचा सारथि बृहन्नडा आहे, तो विजयी व्हावयाचाच ! ' तेव्हां विराट अगदीं रागावून म्हणाला, ' माझा उत्तर व बृहन्नडा या दोघांची बरोबरी करतोस काय ? पुन्हा असे शब्द तोंडांतून काढ तर खरे ! ' गोष्ट इतक्या विकोपास गेली, तरी, कौरवांबरोबर बृहन्नडेशिवाय कोणीही टिकणार नाहीं, असें ठांसून उत्तर देण्यास युधिष्ठिर कच-रला नाहीं ! तेव्हां विराटाचा राग अनावर होऊन त्यानें हातांतला फांसा युधिष्ठिराचे तोंडा-

वर मारला. त्यामुळें त्याचे नाकांतून रक्त वाहूं लागलें. तरी युधिष्ठिरानें आपली शांति सोडली नाहीं. इतक्यांत उत्तर तेथें आला आणि कंकाची ती अवस्था पाहून, असें कोणीं केलें, म्हणून त्यानें विचारलें. तेव्हां विराटानें सर्व हकीगत त्याला सांगितली. मग आपल्या बापाला कांहींसा दोष देऊन उत्तर म्हणाला, ' मीं कौरवांना जिंकलें नाहीं, व गाईही सोडविल्या नाहींत. मी रणांतून पळूनच येत होतों. इतक्यांत एका देव-पुत्रानें येऊन मला धीर दिला व कौरवांचा पराजय केला. उद्यां किंवा परवां येऊन तो आपल्याला भेटेल. ' ही हकीगत ऐकून आपल्या हातून रागांत घडलेल्या प्रकाराबद्दल विराटाला फार वाईट वाटलें व कंकाला त्यानें तसें बोलू-नही दाखविलें.

पुढें एकदोन दिवसांनीं पांडवांनीं आपल्या खऱ्या रूपांची ओळख विराटास दिली. तेव्हां त्याला फार आनंद झाला. व अर्जुनानें उत्तरेचा स्वीकार करावा, अशी आपली इच्छा आहे, असेंही त्यानें लागलेंच कळविलें. तेव्हां अर्जुन

म्हणाला, ' मीं तिला नृत्यगायन शिकविल्यामुळें तिचें माझें गुरु-शिष्यांचें नातें झालें आहे. मला ती मुलीप्रमाणेंच वाटते. तेव्हां माझ्या अभिमन्यूशीं तिचा विवाह करून तिला आपली सून करण्यास मी तयार आहें. ' विराटाला तें त्याचें म्हणणें मान्य झालें. हा उत्तरेचा विवाह ठरल्यानंतर पांडव उपप्लव्य नांवाचे एका नगरांत जाऊन राहिले. धर्मानें आपल्या सर्व आप्तांना व इष्टमित्रांना तेथें बोलावून आणिलें. मग उत्तरा व अभिमन्यु यांचा विवाह मोठ्या थाटानें झाला. तेरा वर्षें दुःखांत काढल्यानंतर या पहिल्याच मंगलप्रसंगानें सर्वांना किती तरी आनंद वाटला !

---

# ५ उद्योगपर्व.

-❀*❀-

पांडवांनीं बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास पुरा केला. द्यूतांतील अटीप्रमाणें दुर्योधनानें आपलें राज्य परत न केल्यास काय

करावें ? हा प्रश्न नंतर त्यांच्या मनांत साहजिकपणें घोळूं लागला. अभिमन्यूचे लग्नाकरितां उपप्लव्य नगरांत द्रुपद व पांडवांच्या बाजूचे इतर राजे जमले होते. लग्न उरकल्यानंतर एके दिवशीं हे सर्व राजे विराटाचे सभागृहांत जमले असतां वरील प्रश्न निघाला. त्या वेळीं श्रीकृष्ण म्हणाला, " दुर्योधनानें आजपर्यंत पांडवांना कसें वागविलें, त्यांना काय छळ सोसावा लागला, त्यांनीं वनवासांत कसे हाल काढले, हें सर्व तुम्हांस ठाऊक आहेच. केवळ सत्यासाठीं त्यांनीं इतकीं संकटें भोगलीं आहेत. दुर्योधन आतां त्यांचें राज्य परत देईल कीं नाहीं, हें कळत नाहीं. तेव्हां अशा स्थितींत काय करावें, याचा तुम्हीं सर्वांनीं विचार करावा. अर्धे राज्य मागण्यासाठीं कौरवांकडे एक दूत पाठवावा, असें मला वाटतें. " यानंतर बराच वादविवाद झाला. शेवटीं वृद्ध द्रुपद राजानें पोक्तपणाची मसलत दिली. तो म्हणाला, दुर्योधन सरळपणानें पांडवांचें राज्य देणार नाहीं. गरीबीनें बोलूं लागल्यास पांडव भित्रे आहेत, असें त्यास वाटेल.



जागा झाल्यावर श्रीकृष्णानें प्रथम अर्जुनास व नंतर दुर्योधनास पाहिलें. [पृ० ९३.

तेव्हां श्रीकृष्णाचे मसलतीप्रमाणें कौरवांकडे एक दूत पाठवावा; व इकडे आपणांस युद्धांत साहाय्य करण्याबद्दल विनंती करण्यासाठीं निरनिराळ्या राजांकडेही दूत पाठवावे. या मसलतीप्रमाणें करावयाचें ठरलें. नंतर द्रुपदराजानें आपला पुरोहित दूत म्हणून कौरवांकडे पाठविला. मदत मागण्याकरितां सर्व राजांकडेही पांडवांकडून दूत गेले.

पुढें होणाऱ्या युद्धांत आपणांस श्रीकृष्णाचें साहाय्य असावें, असें कौरव व पांडव या दोघांनाही वाटत होतें. त्याप्रमाणें त्यास आमंत्रण करण्यासाठीं पांडवांचे बाजूनें अर्जुन व कौरवांचे बाजूनें दुर्योधन हे द्वारकेस गेले; दोघेही एकाच दिवशीं तेथें पोंचले. दुर्योधन पहिल्यानें पोहोंचला तेव्हां श्रीकृष्ण निजला होता; म्हणून तो त्याचे उशाचे बाजूस एका आसनावर बसला. मागाहून अर्जुन आला. तो नम्रपणानें श्रीकृष्णाचे पायांशीं बसला. जागा झाल्यावर श्रीकृष्णानें पहिल्यानें अर्जुनास व नंतर दुर्योधनास पाहिलें. तेव्हां दुर्योधन म्हणाला, युद्धामध्यें तुझें

साहाय्य मागण्यास मी आधीं आलों आहें, माझ्या पक्षाकडे तूं यावें.' त्यावर श्रीकृष्णानें उत्तर केलें, " दुर्योधना, तूं आधीं आलास खरा; पण मीं अर्जुनास आधीं पाहिलें आहे. तेव्हां मी दोन्ही पक्षांस साहाय्य करितों. एका पक्षास माझे दहा लक्ष यादव साहाय्य करतील; व दुसऱ्या पक्षास मी स्वतां एकटा साह्य करीन, मात्र मी युद्ध करणार नाहीं व हातीं शस्त्रही घेणार नाहीं. अर्जुना तुला यांतलें काय पतकरतें तें बोल." हें ऐकून अर्जुन म्हणाला, ' कृष्णा, तूं एकटा मजकडे ये.' युद्ध न करणाऱ्या व निःशस्त्र श्रीकृष्णापेक्षां दहा लक्ष सशस्त्र यादव आपणास मिळाले, हें पाहून भोळ्या दुर्योधनास आनंद झाला ! नंतर दुर्योधन निघून गेला. यादवांचें सैन्य न मागतां तूं मलाच कां मागितलेंस ! असें मग श्रीकृष्णानें अर्जुनास विचारलें. तेव्हां तो म्हणाला, ' कृष्णा, जिकडे तूं, तिकडे यश व कीर्ति हीं असतात, हें मी जाणून आहें. म्हणून मीं तुला पसंत केलें. तूं माझा सारथी व्हावें, ही माझी पुष्कळ दिवसांची इच्छा या

वेळीं तूं पूर्ण कर.' ती गोष्ट श्रीकृष्णानें आनंदानें कबूल केली. मग श्रीकृष्ण व अर्जुन युधिष्ठिराकडे आले.

पांडवांचे दूत रवाना झाल्याचें ऐकून कौरवांनींही निरनिराळ्या राजांकडे आपले दूत पाठविले होते. त्यामुळें या सुमारास दोन्ही बाजूंचीं सैन्यें हळुहळू जमूं लागलीं.

---

## समेटाची खटपट.



इकडे द्रुपदराजाचा पुरोहित हस्तिनापुरास आला. कौरवसभेंत येऊन पांडवांचें म्हणणें त्यानें धृतराष्ट्रास कळविलें. त्या पुरोहिताचें एकंदर बोलणें भीष्मास फार पसंत पडलें. आम्ही सर्व गोष्टींचा विचार करून आमचें म्हणणें कळविण्याकरितां संजयास लवकरच युधिष्ठिराकडे पाठवितों, असें सांगून धृतराष्ट्रानें शेवटीं त्याला निरोप दिला. त्याप्रमाणें धृतराष्ट्राकडून संजय आला. त्यानें आणलेला निरोप अगदीं मोघम होता. अर्धें राज्य देतों किंवा नाहीं, असा त्यांत

कांहीं स्पष्ट उलगडा नव्हता. तो निरोप ऐकून युधिष्ठिरासही फार राग आला. शेवटीं त्यानें आपलें म्हणणें संजयास कळविलें. तें असें:—आमचें राज्य आम्हांस द्यावें किंवा युद्धास तयार व्हावें, हे दोनच मार्ग आतां राहिले आहेत. तरीसुद्धां युद्ध होऊन सर्व कुरुकुळाचा नाश व्हावा, हें आम्हांसही बरें दिसत नाहीं. यासाठीं आम्हां पांच भावांना पांच गांवें जरी तुमच्याकडून मिळालीं, तरी तेवढ्यांतही आमचें समाधान होईल. व तेवढ्यावर तुमचे मागील सर्व अपराध पोटांत घालून आम्ही सख्य करण्यास तयार आहों. हा युधिष्ठिरानें सांगितलेला निरोप श्रीकृष्णासही पसंत पडला.

हस्तिनापुरास आल्यानंतर सभेमध्यें धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, दुर्योधन, वगैरे सर्व मंडळी बसली असतां पांडवांचा निरोप संजयानें त्यांस सांगितला. नंतर त्यावर तेथें पुष्कळ वादविवाद झाला. पांडवांचें राज्य परत देण्यांतच सर्वांचें कल्याण आहे, असा उपदेश भीष्म व द्रोण यांनीं केला. धृतराष्ट्र व दुर्योधन या दोघांना

त्यांनीं अनेक समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. कांहीं वेळानें धृतराष्ट्राच्या मनाला युद्धानें होणारा नाश दिसूं लागला. तेव्हां त्याचें मन वळलें. पण उपयोग काय? दुर्योधन कोणाचेंही ऐकेना. तो अगदीं हट्टासच पेटला. पांच गांवांची तर गोष्टच नको; पण सुईच्या अग्रावर राहील, एवढी मातीही मी पांडवांस देण्यास तयार नाहीं. असें त्यानें साफ सांगितलें. व कर्णाचेंही त्याच्या म्हणण्याला पाठबळ मिळालें. दुर्योधन आपलें ऐकत नाहीं, हें पाहून धृतराष्ट्र व गांधारी यांना फार वाईट वाटलें. पण करतात काय? त्यांच्या दुष्ट व दुराग्रही मुलापुढें त्यांचें कांहींच चालेना!

---

## श्रीकृष्णाची मध्यस्थी.

जशी ही कौरवसभेंत वाटाघाट झाली, तशीच, युद्ध करावें कीं न करावें, याविषयीं पांडवांकडेही वाटाघाट चालली होती. आम्हीं निदान पांच गांवें मागितलीं, तींही दुर्योधन देण्यास कबूल होत नाहीं; तेव्हां या वेळीं आम्हीं काय

करावें, हें तूंच आतां सांग, असें युधिष्ठिर श्रीकृ-
ष्णास म्हणाला. मीच जाऊन तुम्हां दोघांत
सख्य झालें तर पाहतों, असें यावर श्रीकृष्णानें
उत्तर दिलें. पण श्रीकृष्णानें एकट्यानें कौरवां-
कडे जावें हें युधिष्ठिरास बरें वाटेना. कारण,
दुर्योधन कांहीं तरी त्याचा घात करील, अशी
त्याला भीति वाटत होती. पण, माझ्याविषयीं
तूं कांहीं चिंता करूं नको, मी सर्वांना पुरून
उरणारा आहें, असें सांगून श्रीकृष्णानें त्याची
समजूत केली, व सर्व पांडवांचा निरोप घेऊन
तो कौरवांकडे आला. हस्तिनापुरास पोहोंल्या-
वर त्यानें पहिल्यानें राजवाड्यांत जाऊन धृत-
राष्ट्राची भेट घेतली; नंतर तो विदुराकडे जाऊन
उतरला. विदुर हा त्याचा भक्त होता. **भक्त
जरी गरीब असला, तरी परमेश्वराला तो
फार आवडतो. तो श्रीमंतीकडे पहात नाहीं,
भक्तीकडे पाहतो.** असो. विदुराकडे कुंतीची
व त्याची गांठ झाली. तेव्हां चार समजुतीच्या
गोष्टी सांगून श्रीकृष्णानें तिच्या दुःखी मनाचें
समाधान केलें. दुसरे दिवशीं श्रीकृष्णास सभेंत

आणण्यासाठीं दुर्योधन, विदुर व शकुनि हे आले. त्याप्रमाणें श्रीकृष्ण राजवाड्यांत आला. नंतर तो म्हणाला, "कौरव व पांडव यांचें सख्य व्हावें, अशी खटपट करण्याकरितां मी आलों आहें." युद्धापासून काय काय तोटे होणार आहेत, सख्य केल्यापासून कसें दोघांचेंही हित होणार आहे, पांडवांनीं केवळ सत्याकरितां आजपर्यंत कसे हाल भोगले, वगैरे गोष्टी त्यानें नंतर आपल्या भाषणांत स्पष्टपणें सांगितल्या, व सभेंतील विचारी माणसांना त्या पसंतही पडल्या. यानंतर, गर्वानें व लोभानें मनुष्याचा समूळ नाश होतो; तेव्हां दुराग्रह सोडून श्रीकृष्णाचे व इतर आप्तांचे सांगण्याप्रमाणें पांडवांशीं सख्य कर, असा उपदेश तेथें आलेल्या अनेक ऋषींनींही केला. शेवटीं, हा सगळा दुर्योधनाचा दुराग्रह आहे; तेव्हां त्याचें मन वळविण्याचा श्रीकृष्णानें एकदां स्वतां प्रयत्न करावा, असें धृतराष्ट्रानें म्हटलें. असें त्यानें म्हटल्यावर श्रीकृष्ण, भीष्म, विदुर व द्रोण यांनीं दुर्योधनाला आपल्याकडून परोपरीनें पुष्कळ सांगि-

तलें. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट तो अधिक रागास चढून म्हणाला, " पांडव आम्हांला धमकी देत आहेत. पण धमकीला भिऊन राज्य परत देणें, हें खऱ्या क्षत्रियाचें काम नव्हे. पांडवांपुढें मान वांकविण्यापेक्षां आम्ही सगळे युद्धांत मेलों, तरी त्याचें मला दुःख वाटणार नाहीं. सुईच्या अग्रावर राहील इतकी मातीही पांडवांस देण्यास मी तयार नाहीं. मग याकरितां सर्व राष्ट्राचा नाश झाला, तरी चालेल." अशा रीतीनें याचीं आर्जवें करणें व्यर्थ आहे, असें दिसल्यानंतर श्रीकृष्ण आवेशानें म्हणाला, " तुला रणांतील धुळींत लोळण्याची इच्छा आहेना? ठीक आहे. तुझी ही इच्छा पांडव लवकरच पूर्ण करतील. आज तूं त्यांना त्यांचें राज्य देत नाहींस; पण जेव्हां तूं धुळीमध्यें लोळत पडशील, तेव्हांमात्र तुला तें मुकाट्यानें द्यावें लागेल. हें तूं पक्कें समजून ठेव." हें ऐकून दुर्योधन उद्धटपणानें सभेमधून कांहीं न बोलतां चालता झाला; व त्याचेमागून दुःशासनादि सर्व कौरवही निघून गेले. कौरवकुळाचा



दुर्योधनानें श्रीकृष्णाला कैदेंत टाकण्याचा बेत केला. [ पृ० १०१.

व सर्व क्षत्रियांचा पुढें होणारा नाश टाळण्या-साठीं दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि या चौकडीला कैद करून पांडवांचे स्वाधीन करावें, अशी मसलत श्रीकृष्णानें धृतराष्ट्राला स्पष्टपणें दिली. शेवटचा उपाय म्हणून गांधारीस बोलावून आणून तिला दुर्योधनाची समजूत करण्यास धृतराष्ट्रानें सांगितलें. तिनेंही आपलेकडून त्याला पुष्कळ सांगितलें; पण त्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट त्या चांडाळचौकडीनें श्रीकृष्णालाच बंदींत टाकण्याचा बेत केला. हा त्यांचा बेत सात्यकीस कळून आला; तेव्हां त्यानें धृतराष्ट्र, विदुर व श्रीकृष्ण यांस तो कळविला. तेव्हां धृतराष्ट्रानें दुर्योधनाला पुन्हा सभेंत बोलावून आणलें. श्रीकृष्णाला कैद करण्याचा बेत करून उगीच तूं आपला घात करून घेऊं नको , असा विदुरानें त्याला बोध केला. इतक्यांत श्रीकृष्णानें हांसून आपल्या ईश्वरी शक्तीचा चमत्कार तेथें दाखविला. तो पाहून सर्व सभा अगदीं चकित होऊन गेली. व श्रीकृष्णानें आपल्या रथाची वाट धरली.

भीष्म व द्रोण या दोघांचें पांडवांवर अत्यंत प्रेम होतें. त्यांचा पक्ष अगदीं खरा आहे, हेंही त्यांना पूर्णपणें ठाऊक होतें. पण ते कौरवांची सेवा करीत होते, त्यांचें अन्न खात होते. तेव्हां युद्ध करावयाचें, असें एकदां दुर्योधनानें ठरविल्यावर त्याच्या बाजूनें लढणें हा आपला धर्म आहे, मग तो धर्म आचरतांना मनाला कितीही दु:ख झालें तरी चालेल, असें त्यांनीं ठरविलें व तें योग्यही होतें.

तेथून निघतांना श्रीकृष्णानें कर्णाला आपल्या रथांत घेतलें. रथ चालू झाल्यावर तो त्याला म्हणाला, " कर्णा, कुंति तुझी खरी आई असून तूं पांडवांचा वडील भाऊ आहेस. तेव्हां मी तुला त्यांच्याकडे नेतों व तुझ्या जन्माची कथा त्यांना सांगतों. म्हणजे त्यांना फार आनंद होईल. ते तुलाच सर्व राज्य देतील. व त्यांच्या मदतीनें तूं पृथ्वीचा राजा होशील. " यावर कर्णानें उत्तर केलें, " कुंति ही माझी माता आहे, हें मला माहीत आहे. पण जन्मतांच तिनें मला टाकून दिल्यावर अधिरथ नांवाच्या

सारथ्यानें मला आपल्या घरीं आणलें, व त्याची स्त्री राधा हिनें मला वाढविलें. त्याचप्रमाणें दुर्योधनाचे आश्रयानें आजपर्यंत मी राहिलों. त्यानें अंग देशाचें राज्य देऊन मला मोठ्या योग्यतेस चढविलें. तेव्हां हीं सर्व माणसें सोडून ऐन युद्धाचे वेळीं मला पांडवांकडे येतां येत नाहीं. अशा वेळीं कौरवांचा पक्ष मी सोडणें अगदीं नीचपणाचें आहे. तसें मी कधींही करणार नाहीं." नंतर श्रीकृष्णाचा प्रेमानें निरोप घेऊन कर्ण हस्तिनापुरास परत आला.

पुढें युद्धाची बहुतेक तयारी झाली आहे, असें जेव्हां कुंतीला समजलें, तेव्हां पांडवांना मिळण्याबद्दल कर्णाचें मन वळवावें, असें तिला वाटलें. एक दिवस तिची व त्याची भागिरथी नदीवर सहज गांठ पडली. तेव्हां प्रेमानें बोलून तिनें त्याच्याजवळ तशी गोष्ट काढली. तेव्हां आपल्याला निर्दयपणानें लहानपणीं टाकून दिल्याबद्दल व आतां युद्धाचे वेळीं तेवढी आपल्या नात्याची ओळख दिल्याबद्दल त्यानें तिला पुष्कळच दोष दिला. तथापि शेवटीं त्यानें तिला एक वचनमात्र दिलें.

तें असें कीं, धर्म, भीम, नकुल व सहदेव यांचा मी युद्धांत वध करणार नाहीं; पण अर्जुनाशींमात्र त्याचा किंवा माझा वध होईपर्यंत मी युद्ध करणार. या वचनानें समाधान पावून कुंति विदुराचे घरीं परतली.

दोन्ही पक्षांकडून युद्धाची तयारी झाली. कौरवांचें अकरा अक्षौहिणी[1] सैन्य कुरुक्षेत्राच्या मैदानावर येऊन तळ देऊन बसलें. दुर्योधनाचे विनंतीवरून भीष्म त्याचा सेनापति झाला होता. पांडवांचे बाजूला सात अक्षौहिणी सैन्य जमलें होतें. श्रीकृष्णाच्या सूचनेवरून द्रौपदीचा भाऊ धृष्टद्युम्न यास पांडवांनीं मुख्य सेनापति नेमिलें. नंतर पांडवांचे सैन्यानेंही कुरुक्षेत्रांत येऊन तळ दिला,

---

## ६ भीष्मपर्व.



कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर दोन्ही सैन्यें युद्धास तयार होऊन समोरासमोर उभीं राहिलीं. श्रीकृ-

१ एक अक्षौहिणी सैन्य म्हणजे १०९३५० पायदळ, ६५६१० घोडेस्वार, २१८७० रथ व २१८७० हत्ती.



'मी युद्ध करीत नाहीं' असें त्यानें श्रीकृष्णास सांगितलें. [पृ० १०५.

ष्णानें अर्जुनाचा रथ दोहों सैन्यांच्या मध्यभागीं आणून उभा केला. तेव्हां भोंवताल्च्या सैन्या-कडे दृष्टि फेंकल्यावर एकदम अर्जुनाचें मन माघार खाऊं लागलें. पण मनांत भीति वाटली म्हणून नव्हे. तर आपले इष्टमित्र, नातेवाईक, भीष्मासारखीं वडील माणसें, द्रोण व कृप यां-सारखे गुरु व दुसरे मोठमोठे शूर योद्धे, यांचा केवळ राज्याकरितां आपले हातून नाश होणार, असा विचार मनांत येऊन त्याचें मन कचरूं लागलें; हातपाय मोडल्यासारखे झाले; सगळ्या अंगाला कांपरें सुटलें; धनुष्य हातांतून गळून पडलें, शेवटीं ' मी युद्ध करीत नाहीं, ' असें श्रीकृ-ष्णांस सांगून तो अगदीं स्वस्थ बसला. तेव्हां श्रीकृष्णानें गोड व सुंदर उपदेश करून त्याचा भ्रम दूर केला, व त्याला युद्ध करायला लावलें. हा उपदेश ' श्रीभगवद्गीता ' या नावान प्रसिद्ध आहे. त्या उपदेशाचें तात्पर्य असें:—धर्म(कर्तव्य) हा मनुष्याला मुख्य आहे. त्याच्यापुढें बाकी सगळ्या गोष्टी तुच्छ आहेत. धर्म आचरीत अस-तांना कराव्या लागणाऱ्या गोष्टी जरी कदाचित्

दिसण्यांत वाईट दिसल्या, तरी त्या खऱ्या वाईट नव्हत. मनुष्यानें परमेश्वरावर सर्वस्वीं भार टाकावा, व आपलें कर्तव्य करावें. धर्माप्रमाणें चालणें—आपलें कर्तव्य करणें—एवढेंच माणसाचें काम आहे. त्यानें कर्में करावीं व परमेश्वराला तीं वाहून टाकावीं. म्हणजे कर्तव्य केल्यापासून होणाऱ्या सुखदुःखाचा मनुष्यानें अगदीं विचार करूं नये. युद्ध करणें हा क्षत्रियाचा धर्म आहे. तें न करशील, तरमात्र तुझी कीर्ति जाईल व तुला पाप लागेल. **अपकीर्ति ही थोर माणसाला मरणाहूनही ज्यास्त भयंकर वाटते.** अरे, युद्धांत तूं मरण पावलास तर स्वर्गाला जाशील, जय मिळविलास, तर पृथ्वीचें राज्य भोगशील. तेव्हां उठ; युद्धाला आरंभ कर. "

तिसरे प्रहरीं युद्धाला सुरवात झाली. दोन सैन्यें एकमेकांस भिडलीं; व एका क्षणांत जिकडे तिकडे भयंकर युद्ध माजून गेलें. मोठमोठ्या वीरांचे रथ एकमेकांशीं येऊन थडकले. पहिल्याच दिवशीं विराटाचा पुत्र उत्तर याचा वध करून शल्यानें त्याची युद्धदेवतेला पहिली आहुति

दिली. त्याचा दुसरा पुत्र श्वेत याला भीष्मानें मारलें. दुसऱ्या दिवशीं भीमानें कलिंगाचा वध केला. या दिवशीं भीष्मानें पांडवांकडील सैन्याला नको नकोसें करून टाकलें. तिसऱ्या दिवशीं आपापल्या सैन्यांची व्यूहरचना करून दोघांनीं युद्ध सुरू केलें. युद्धाला रंग येत नाहीं, असें पाहून श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ नेऊन भीष्माचे रथास भिडविला. दोघांचें युद्ध सुरू झालें. पण अर्जुन भीष्माशीं मनापासून लढत नाहीं, असें पाहून त्याच्या मनाला चेव आणण्याकरितां श्रीकृष्ण हातांत चक्र घेऊन भीष्मावर चालून गेला. तेव्हां मी आतां निकरानें लढतों, असें सांगून अर्जुनानें त्याला मागें आणलें. अशा रीतीनें आठ दिवस दोन्ही पक्षांकडून भयंकर युद्ध झालें. भीष्मानें पुष्कळ सैन्याचा रोज संहार केला. पण इतक्या दिवस युद्ध करून-सुद्धां पांडवांपैकीं कोणीही मेला नाहीं, हें पाहून दुर्योधनास चिंता उत्पन्न झाली. त्यानें कर्णाची गांठ घेऊन याबद्दल मसलत केली. भीष्म, द्रोण वगैरे वीरांचा पांडवांकडे ओढा असल्यामुळें ते

मनापासून लढत नाहींत, म्हणून असें झालें, असा दोघांनीं आपसांत निश्चय केला. नंतर तो भीष्माला फार लागून बोलला. तेव्हां भीष्माला फार वाईट वाटलें व संताप आला. मग, मी मरेन किंवा पांडवांना मारीन, अशी भीष्मानें प्रतिज्ञा केली. पुढें भीष्मानें युद्धाची अगदीं कमाल केली. भीष्म मेल्याशिवाय आपल्याला जय मिळावयाचा नाहीं, असें जाणून धर्मानें भीष्माकडे जाऊन त्याच्या मरणाचा उपाय विचारला. तेव्हां शिखंडीला पुढें करून तुम्ही युद्ध करा, म्हणजे माझा वध होईल. कारण शिखंडी हा पूर्वीं स्त्री होता. तेव्हां त्याच्यावर मी शस्त्र उचलणार नाहीं, असें भीष्मानें सांगितलें. दहाव्या दिवशीं तर अगदीं शिकस्तीचें युद्ध झालें. भीष्मापुढें कोणाचाही टिकाव लागेना. शिखंडीच्यामागें उभा राहून अर्जुनानें त्याच्यावर बाणांचा अगदीं पाऊस पाडला. शेवटीं तो हजारों बाण लागल्यामुळें व्याकुळ होऊन रथावरून खालीं पडला. त्याच्या शरीरास इतके बाण लागले होते कीं, त्याचें शरीर जमिनीस न लागतां बाणांच्या

टोंकांवर तोलून राहिलें ! त्याला त्याच्या बापानें संतुष्ट होऊन एकदां इच्छामरणाचा वर दिला होता. या वेळीं दक्षिणायन होतें, व दक्षिणायनांत मरण चांगलें नव्हे. तेव्हां त्या वराच्या बळावर भीष्म उत्तरायण येईपर्यंत त्या बाणांच्या बिछान्यावर तसाच पडून राहिला. उत्तरायण आल्यावर त्यानें प्राण सोडला.

---

# ७ द्रोणपर्व.

## अभिमन्यूचा वध.

सर्वांचा विचार घेऊन भीष्माचेमागून दुर्योधनानें द्रोणाचार्यांना सेनापतीचा अधिकार दिला. त्या वेळीं, युधिष्ठिराला जिवंत धरून मी तुझ्या स्वाधीन करितों, असें वचन द्रोणाचार्यांनीं दुर्योधनाला दिलें. तें पांडवांच्या कानीं गेलें, तेव्हां त्यांना मोठी धास्ती उत्पन्न झाली. पण, मी जोंपर्यंत जिवंत आहें, तोंपर्यंत युधिष्ठिरास शत्रूचे हातीं लागूं देणार नाहीं, अशी अर्जुनानें

प्रतिज्ञा करून सर्वांचें भय दूर केलें. नंतर युद्धाला प्रारंभ झाला. अर्जुनाचा पुत्र अभिमन्यु यानें त्या दिवशीं फारच पराक्रम करून जयद्रथ, शल्य वगैरे मोठमोठ्या वीरांचा पराभव केला. युधिष्ठिराला पकडण्याकरितां द्रोणाचार्यांनीं आपली शिकस्त केली, तरी अर्जुनापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. तेव्हां कौरवांनीं लबाडीनें अर्जुनाला रणांगणापासून दूर नेऊन तिकडेच त्याला युद्धाला गुंतविलें. इकडे द्रोणाचार्यांनीं आपल्या सैन्याची चक्राकार रचना करून युद्धाला सुरवात केली. तेव्हां या चक्रव्यूहाची फळी फोडावी कोणीं, अशी युधिष्ठिरास चिंता पडली. अर्जुन, श्रीकृष्ण, प्रद्युम्न व अभिमन्यु यांवांचून कोणासही हा व्यूह फोडतां येत नव्हता. या चौघांपैकीं अभिमन्युमात्र त्या वेळीं तेथें होता. अभिमन्यूला व्यूहांत शिरतां येत होतें; पण त्यांतून त्याला परत येतां येत नव्हतें. शेवटीं युधिष्ठिरानें अभिमन्यूला अशी आज्ञा केली कीं, तूं नुसती वाट काढीत पुढें चल, म्हणजे आम्ही सगळे जण तुझ्या पाठोपाठ येऊन

सर्वांची कत्तल करून टाकतों. वडिलांच्या या आज्ञेप्रमाणें तो बालवीर शत्रूचे सैन्यांत घुसूं लागला. अभिमन्यूचें वय लहान खरें, पण त्या दिवशीं त्यानें द्रोण, कर्ण, शल्य, दुःशासन, दुर्योधन वगैरे मी मी म्हणणाऱ्या वीरांना मागें हटवून टाकलें. अभिमन्यु पुढें व इतर पांडववीर मागें याप्रमाणें कौरवसैन्यांत शिरून त्यांनीं त्याची अगदीं दाणादाण केली. कौरवांचें सैन्य पळूं लागलें. पण इतक्यांत जयद्रथानें त्वेषानें हल्ला करून पांडवांकडील वीरांना मध्येंच अडवून धरलें. अभिमन्युमात्र एकटा पुढें चालला. पण त्याला कोणाचाही आधार राहिला नाहीं. तरी तो घाबरला नाहीं. तो इतक्या शूरपणानें लढला कीं, कोणाही वीराला त्यानें आपलेपुढें उभा राहूं दिलें नाहीं. सर्वांनीं अगदीं त्याचेपुढें हात टेंकले. कोणाही एकट्या वीराचा त्याच्या पुढें टिकाव लागत नाहीं, असें पाहून द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, कृप, कृतवर्मा व बृहद्बल हे सहा महारथी एकदम त्याच्यावर तुटून पडले. तरी त्यानें आपल्या पराक्रमानें सर्वांना दिपवून

टाकलें. शेवटीं तो व्याकुळ पडला असतां दुःशासनाच्या पुत्रानें त्याच्या मस्तकीं गदा घालून त्याला मारलें !

---

## जयद्रथाचा वध.



अभिमन्यु पडला, तेव्हां कौरवांच्या आनंदाला व पांडवांच्या दुःखाला सीमा राहिली नाहीं. आपल्या बाजूचें युद्ध आटपून अर्जुन सायंकाळीं आपल्या छावणींत परत आला. तेव्हां, अभिमन्यूचे पाठोपाठ सर्व पांडववीर व्युहांत शिरत असतां जयद्रथानें मध्यें येऊन त्यांना थोपवून धरल्यामुळें अभिमन्यु व्युहांत एकटा सांपडला, व त्याला अनेक वीरांनीं मिळून अधर्मानें मारलें, ही हकीकत त्याला कळली. तेव्हां तो पुत्रशोकानें अगदीं वेडा होऊन गेला. त्यांतले त्यांत आपला पुत्र व्याकुळ पडला असतां जयद्रथानें त्याच्या डोक्यावर लाथ मारली, हें जेव्हां त्याला समजलें, तेव्हां तो संतापानें अगदीं खवळून गेला. त्या त्वेषाच्या

भरांत त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं, उद्यां सूर्य अस्तास जाण्यापूर्वीं जर मीं आपल्या हातानें जयद्रथाला मारलें नाहीं, तर मी आपल्याला जिवंत जाळून घेईन. ही बातमी जयद्रथास कळतांच तो भयानें गांगरून गेला, पण, आम्ही तुझें रक्षण करितों, भिऊं नको, असा द्रोण व दुर्योधन यांनीं त्याला धीर दिला, तेव्हां त्याला कांहीं बरें वाटलें. दुसऱ्या दिवशीं युद्ध पुन्हा सुरू झालें. सात्यकीला धर्माचें रक्षण करण्याला ठेवून अर्जुनानें कौरवांवर चाल केली. पहिल्या सपाट्याला त्यानें दुःशासनाची धुळधाण उडविली. मग द्रोणाचार्याचें व त्याचें युद्ध लागलें. पण तें मध्येंच सोडून श्रीकृष्णानें त्याचा रथ जयद्रथ होता त्या बाजूला वळविला. इतक्यांत अर्जुनाचा रथ कोठें दिसत नाहीं, असें पाहून युधिष्ठिराला चैन पडेना. तेव्हां त्यानें सात्यकीला त्याच्या शोधाला पाठविलें. सात्यकीनें द्रोण, दुर्योधन, दुःशासन यांचा पराभव करून जोरानें युद्ध चालविलें. सात्यकी लौकर परत आला नाहीं, तेव्हां युधिष्ठिराला फारच काळजी

लागली. त्यानें भीमाला तिकडे पाठविलें. युद्धांत घुसल्यावर भीमानें द्रोण व कर्ण यांची चांगलीच खोड मोडली. इतक्यांत श्रीकृष्णानें आपल्या दिव्य शक्तीनें सूर्यास झांकून टाकलें. तेव्हां सूर्य मावळला, असं जयद्रथास वाटलें, व तो बेसावधपणानें सैन्यांत वावरूं लागला. अर्जुनाची प्रतिज्ञा फुकट गेली, आतां तो अग्नींत उडी टाकील, आपण ती गंमत पाहावयाला जाऊं, अशा मौजा तो आपल्या ठिकाणीं मारीत होता. सूर्य खरोखरच अस्तास गेला, अशी अर्जुनाचीही समजूत होऊन त्याला फार दुःख झालें. प्रतिज्ञेप्रमाणें अग्नींत उडी टाकण्याची त्यानें तयारी केली. इतक्यांत श्रीकृष्णानें असें सुचविलें कीं, तूं क्षत्रिय आहेस, तेव्हां धनुष्याला बाण लावून अग्नींत उडी टाकणें, हेंच तुला योग्य आहे. हें म्हणणें अर्जुनाला मान्य झालें. व त्याप्रमाणें तो तयार झाला. इतक्यांत सूर्यावर आपण घातलेलें झांकण चटकन काढून श्रीकृष्ण म्हणाला, ' हा पहा सूर्य व हा जयद्रथ, ' त्यानें असें म्हणतांच अर्जुनानें एकाच बाणानें जयद्र-

थाचें डोकें उडविलें. व आपली प्रतिज्ञा पुरी केली. ही गोष्ट युद्धाचे चवदावे दिवशीं घडली.

---

## घटात्कचाचा वध.

जयद्रथाचा वध झालेला पाहून दुर्योधन द्रोणाचार्यांना पुष्कळ टाकून बोलला. त्याचीं तीं टोंचून बोलणीं ऐकून द्रोणाचार्यांना फार वाईट वाटलें, मी आतां सर्वांचा वध करीन, किंवा मी तरी मरून जाईन, अशी मग त्यांनीं प्रतिज्ञा केली. सूर्य मावळला कीं रोज युद्ध बंद होत असे. पण आज तसें कांहीं झालें नाहीं. युद्ध रात्रींही सुरूच राहिलें. रात्र काळोखी असल्यामुळें युद्धाला फारच भयंकर स्वरूप आलें. अनेक वीरांनीं मोठ्या पराक्रमानें युद्ध चालविलें होतें; परंतु भिमाचा पुत्र घटोत्कच यानें अचाट पराक्रम करून कौरवांकडील हजारों लोक मारले. आतां या यमाचे हातून आपली सुटका होत नाहीं, असें सर्व कौरवांना वाटूं लागलें. दुर्योधन तर अत्यंत घाबरून गेला. इंद्रानें तुला जी एक

शक्ति दिली आहे, ती तूं या वेळीं घटोत्कचावर टाक, असा त्यानें कर्णास अतिशय आग्रह केला. कर्णानें ती शक्ति अर्जुनाकरितां राखून ठेविली होती. पण दुर्योधनाचे आग्रहामुळें त्यानें ती घटोत्कचावर टाकली. त्या भयंकर शक्तीनें घटोत्कचाचे प्राण तात्काळ हरण केले. तेव्हां काळाच्या जबड्यांतून आपण सुटलों, असें वाटून कौरवांना फारच आनंद झाला. पांडवमात्र ही बातमी ऐकून दुःखांत अगदीं बुडून गेले. पण, श्रीकृष्णानें आनंदानें अर्जुनास आलिंगन दिलें; कारण ती शक्ति कर्णाच्या हातून गेल्यामुळें आतां अर्जुनाचे जिवास कसलीही भीति उरली नव्हती.

---

## द्रोणाचार्यांचा वध.

द्रोणाचार्यांनीं पांडवांच्या बाजूचे हजारों वीर मारले. द्रुपद, त्याचे नातू व विराट यांचाही त्यांनीं वध केला. अर्जुनानें आपल्या पराक्रमाची पराकाष्ठा केली, तरी द्रोणाचार्यांचा

पराभव होईना; उलट ते पांडवांच्या सैन्याची अगदीं धुळदाण उडवूं लागले. जोंपर्यंत त्यांच्या हातांत शस्त्र आहे, तोंपर्यंत ते कोणालाही हार जाणार नाहींत, असें जाणून श्रीकृष्णानें असें सुचविलें कीं, अश्वत्थामा मेला, असें वर्तमान त्यांना जर कोणी कळवील, तर ते पुत्रशोकानें व्याकुळ होऊन हातचें शस्त्र सोडून देतील. पण तें कृत्य करण्यास अर्जुन तयार होईना; दुसरा कोणीही तसें करण्यास धजेना. शेवटीं भीमानें 'अश्वत्थामा' नांवाचा एक हत्ती आपल्या गदेनें मारला; व 'अश्वत्थाम्याला मीं ठार मारलें,' असें त्यानें द्रोणाचार्यांना जाऊन कळविलें. पहिल्यानें त्यांना फार वाईट वाटलें; पण आपल्या पुत्राचा पराक्रम लक्षांत येऊन ती बातमी खरी नसावी, अशी त्यांना शंका आली. तेव्हां युधिष्ठिर कधींही खोटें बोलणार नाहीं, असें जाणून त्यांनीं त्या बातमीच्या खरेपणाविषयीं त्याला विचारलें. श्रीकृष्णाचे सांगण्यावरून तो अर्धवट खोटें बोलण्यास तयार झाला. अश्वत्थामा मेला; पण नर कीं कुंजर ( हत्ती ) कोण जाणे, असें

त्यानें सांगितलें. पण, ‘ नर कीं कुंजर, कोण जाणे, ’ हे शब्द त्यानें अगदीं हळू उच्चारले. ते द्रोणाचार्यांना ऐकूं गेले नाहींत. धर्माच्या तोंडचे हे शब्द ऐकून द्रोणाचार्यांस फारच दुःख झालें. त्यांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं व ते रथावरच स्वस्थ बसले. इतक्यांत द्रुपदाचा मुलगा धृष्टद्युम्न यानें येऊन तरवारीनें त्यांचें डोकें उडविलें. ही आपल्या पित्याच्या वधाची बातमी अश्वत्थाम्याला कळतांच तो पांडवांवर अगदीं तुटून पडला. त्यानें भयंकर अस्त्रें सोडून पांडवांचा नाश करण्याचा शिकस्तीनें प्रयत्न केला. पण तो सर्व फसला. तेव्हां खजिल होऊन तो रणांगणांतून पळून गेला. द्रोणाचार्य पांच दिवस सेनापति होते. ते पडले तेव्हां युद्धाला पंधरा दिवस पुरे झाले.

---

# ८ कर्णपर्व.

## दुःशासनाचा वध.

पंधरा दिवस युद्ध झालें, तरी आपल्याला जय मिळत नाहीं, उलट भीष्माचार्य व द्रोणाचार्य यांसारखे कसलेले वीर आपण गमावून बसलों, असा विचार मनांत येऊन कौरवांचीं तोंडें अगदीं सुकून गेलीं. तथापि दुर्योधनाचा कर्णावर अजूनही विश्वास होता, तेव्हां त्यानें इतर मंडळींच्या विचारानें आपल्या सेनापतीचें काम कर्णाकडे दिलें. मग युद्धाला पुन्हा सुरवात झाली. अश्वत्थामा व भीम यांचें फारच जोराचें युद्ध झालें; पण दोघेही आपापल्या रथांत बेशुद्ध झाल्यामुळें त्यांचे रथ बाजूला गेले. कांहीं वेळानें अश्वत्थामा व अर्जुन यांचे रथ भिडून अर्जुनानें अश्वत्थाम्याला खूप जखमी केलें. कर्ण व नकुल आणि युधिष्ठिर व दुर्योधन यांचीं युद्धें तर पहिल्या दिवशीं सर्वांत भयंकर झालीं.

नंतर पहिल्या दिवसाचें युद्ध आटोपलें. छावणींत गेल्यावर, उद्यां मी अर्जुनाचा वध करीन किंवा तो तरी माझा करील, अशा निकरानें मी लढणार, अशी कर्णानें प्रतिज्ञा केली.

दुसऱ्या दिवशीं दोन्ही सैन्यें पुन्हा एकमेकांवर तुटून पडलीं. या दिवशीं शल्य हा कर्णाचा सारथि झाला होता. युद्धांत अनेक वीरांच्या झटापटी सुरू झाल्या. भीम व अर्जुन त्वेषानें कर्णाच्या रथाकडे चाल करून जात असतां वाटेंत भीम व दुःशासन यांचे रथ समोरासमोर आले. त्याला पाहतांच भीमाचा संताप अनावर झाला. त्यानें हातांत गदा घेऊन आवेशानें रथाखालीं उडी टाकली; व एकदम दुःशासनाला रथांतून ओढून जमिनीवर पाडलें. नंतर त्याच्या नरडीवर पाय देऊन त्याचा कंठ व छाती हीं आपल्या तरवारीनें त्यानें कापलीं व त्यांतील ऊन ऊन रक्त तो प्याला ! अशा रीतीनें द्रौपदीचा छळ करणाराचा सूड घेऊन त्यानें आपली प्रतिज्ञा पुरी केली.

---

## कर्णाचा वध.



इकडे नकुल व कर्णाचा मुलगा वृषसेन यांचें निकराचें युद्ध चाललें होतें. त्यांत वृषसेनानें नकुलाला जखमी केलें. इतक्यांत अर्जुनानें एका सपाट्याला वृषसेनाचा वध केला. तेव्हां आपला शूर पुत्र मारल्याबद्दल सूड घेण्याकरितां कर्ण अर्जुनाचे रथावर त्वेषानें चाल करून गेला. त्या वेळीं द्रौपदीच्या छळाची व अभिमन्यूच्या वधाची अर्जुनाला आठवण होऊन त्यालाही खूप आवेश चढला. दोघांचें आवेशानें युद्ध सुरू झालें. अस्त्रावर अस्त्रें झडूं लागलीं. इतक्यांत कर्णाच्या रथाचें डावें चाक भूमींत जाऊं लागलें! 'ऐन युद्धांत पृथ्वी तुझ्या रथाचें चाक गिळील व तुझा हाडवैरी तुझें शीर उडवील,' असा एका ब्राह्मणानें त्याला पूर्वीं शाप दिला होता. त्याची आठवण त्याला या वेळीं झाली; व आपलें मरण आतां चुकत नाहीं, असें त्यानें जाणलें. इतक्यांत तो रथाचें चाक वर काढण्यांत गुंतला असतां अर्जुनानें एका बाणानें त्याचें शीर

उडवून दिलें! त्याबरोबर पांडवसैन्यानें आनंदानें गर्जना केली! व कौरवांचे हातपाय बहुतेक मोडले!

---

## ९ शल्यपर्व.



कर्ण पडल्यानंतर कृपाचार्यांनीं, पांडवांशीं सख्य करून आतां तरी युद्ध बंद कर, असा दुर्योधनाला कळकळीनें उपदेश केला. पण मानी दुर्योधनाला तो रुचला नाहीं. त्यानें मद्रदेशाचा राजा शल्य याला आपला सेनापति करून पुन्हा युद्धाला आरंभ केला. पहिल्या तडाक्याला नकुलानें कर्णाचे दोन पुत्र मारले. नंतर शल्य व युधिष्ठिर यांचें भयंकर युद्ध झालें. त्यांत शेवटीं युधिष्ठिराला माघार घ्यावी लागली. कांहीं वेळ इकडे तिकडे युद्ध झाल्यावर युधिष्ठिर व शल्य यांची पुन्हा गांठ पडली. शल्यानें युधिष्ठिराचा सारथि व घोडे ठार मारले; पण इतक्यांत भीमानें शल्याचें चिलखत फोडलें व त्याचा रथही मोडून टाकला. तेव्हां शल्य हातांत ढाल व

तरवार घेऊन युधिष्ठिराचे अंगावर चालून येऊं लागला. तोंच युधिष्ठिरानें एक शक्ति त्याच्यावर जोरानें फेंकून त्याला ठार केलें. तेव्हां कौरवांच्या सर्व आशा जिरून गेल्या.

---

## दुर्योधनाचा पाडाव.



शल्य मेल्यामुळें कौरवांचे फिरून हातपाय गळून गेले. दुर्योधनानें कसाबसा धीर धरून राहिलेलें सैन्य पांडवांवर पाठविलें; पण पांडवांनीं त्याला आपल्यापुढें उभेंही राहूं दिलें नाहीं. कांहीं वेळ वीरांच्या वारीकसारीक झटापटी झाल्यानंतर सहदेव व शकुनि यांचें युद्ध जुंपलें. हें युद्ध मोठ्या कडाक्याचें झालें. शेवटीं सहदेवानें पहिल्यानें त्याचे हात तोडले व नंतर डोकें उडविलें. याप्रमाणें कौरवांच्या बहुतक सगळ्या सैन्याचा या युद्धांत निकाल लागला. मोठ्या वीरांपैकीं कृपाचार्य, अश्वत्थामा व कृतवर्मा हे तिघेच काय ते जिवंत राहिले! त्यांनीं रणांतून पळून आपले जीव वांचविले. दुर्योधन युद्धाच्या शेवटच्या गर्दींत एकटा घोड्यावरून

फिरत होता. अखेरीस त्याचा घोडाही ठार झाला! व तो सर्वस्वीं अगदीं अनाथ व दीन बनला! या वेळीं आपल्या कुळाच्या झालेल्या नाशाचें भयंकर चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहून त्याच्या मनाची अगदीं चमत्कारिक स्थिति झाली! त्याला **विदुरानें** पूर्वीं केलेल्या उपदेशाची या वेळीं आठवण झाली! पण आतां आठवण होऊन काय उपयोग? **दुष्ट माणसांची बुद्धिही ताळ्यावर येते; पण सर्व नाश झाल्यावर! चांगली बुद्धि ही वेळेवर आठवली, तरच कल्याण होतें!** असो. असा विचार करीत तो फिरत असतां, आतां येथें राहणें बरें नाहीं, असें त्याला वाटून तो लांब एका सरोवरावर जाऊन विश्रांतीसाठीं बसला. तेथें त्याला **संजय** भेटला. दुःखामुळें दोघांचे तोंडून शब्द निघेना! शेवटीं, मी जखमांनीं व्याकुळ होऊन या सरोवरांत विश्रांति घेत आहें, असा निरोप धृतराष्ट्रास कळविण्यास त्यानें **संजयास** सांगितलें. **संजय** गेल्यावर तो सरोवरांत शिरून स्वस्थ बसला! इकडे **पांडव** दुर्योधनाचा शोध करीत होते; पण

त्यांना तो कोठेंही दिसेना! इतक्यांत कांहीं शिकारी लोकांनीं तो सरोवरांत लपून बसला आहे, अशी त्यांना बातमी सांगितली. तेव्हां ते तेथें आले; व युधिष्ठिरानें पुष्कळ चिडवून त्याला युद्धाला बोलाविलें. तेव्हां तो त्वेषानें फणाणत बाहेर आला. भीमाचें व त्याचें गदायुद्ध होण्याचें ठरलें. इतक्यांत भीम व दुर्योधन या दोघांनाही गदायुद्ध शिकविणारा श्रीकृष्णाचा वडील भाऊ बलराम हा तेथें आला. कौरवपांडव यांचें युद्ध सुरू होण्यापूर्वींच तो तीर्थयात्रेला निघून गेला होता. नंतर दोघांचें युद्ध सुरू झालें. बराच वेळ झाला, तरी कोणीही हार जाण्याचें लक्षण दिसेना! गदायुद्धाचा असा एक नियम आहे कीं, तें युद्ध खेळणारांनीं बेंबीच्याखालीं कोठेंही एकमेकांना तडाका मारावयाचा नाहीं. पण श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाला, "कपटाशीं कपटच केलें पाहिजे. भीमानें दुर्योधनाची गदेनें मांडी फोडण्याची जी प्रतिज्ञा केली आहे, ती त्यानें या वेळीं पुरी केली, तरच तुम्हांस जय मिळेल." तेव्हां अर्जुनानें आपल्या

डाव्या मांडीवर थापें मारून ती गोष्ट भीमाला सुचविली. ती लक्षांत घेऊन भीमानें एक गदेचा प्रचंड प्रहार दुर्योधनाच्या मांडीवर केला. त्या-बरोबर दुर्योधनाची मांडी मोडून तो ओरडतच जमिनीवर पडला! त्या वेळीं भीमाला भयंकर स्फुरण चढलें होतें. तो लागलाच दुर्योधनाजवळ गेला, व त्याच्या पूर्वींच्या पापांची व अपराधांची त्यास आठवण देऊन डाव्या पायाच्या लाथेनें त्यानें त्याचा मुकुट उडवून दिला,व दुसऱ्या पायानें त्याच्या मस्तकावर लाथ मारली! पण हें त्याचें कृत्य पाहून धर्मराजाला फारच वाईट वाटलें. इकडे, भीमानें गदायुद्धाचा नियम मोडून दुर्यो-धनाचा वध केला, हें पाहून बलरामास फार क्रोध आला. तो अगदीं भीमाच्या अंगावर धांवून गेला. पण, दुर्योधनानें भरसभेंत द्रौपदीची थट्टा करण्याकरितां आपली डावी मांडी उघडी करून दाखविली होती; व ती त्याची मांडी मी गदेनें मोडीन, अशी त्या वेळीं भीमानें प्रतिज्ञा केली होती; ती पुरी करणें हें क्षत्रिय या नात्यानें त्याचें कर्तव्य होतें; वगैरे हकीकत श्रीकृष्णानें

सांगून त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. पण तो तसाच रागानें द्वारकेला निघून गेला! यांनतर पांडव आनंदानें जयघोष करीत छावणींत परत गेले.

दुर्योधन विवळत पडल्याची बातमी कांहीं लोकांनीं कृपाचार्य, अश्वत्थामा व कृतवर्मा यांस सांगितली. तेव्हां ते लागलेच तेथें आले. दुर्योधनाची ती अवस्था पाहून त्यांना फारच दुःख झालें. तितक्यांत अश्वत्थाम्यानें संतापानें पांडवांचा वध करून सूड उगविण्याची प्रतिज्ञा केली. ती ऐकून दुर्योधन मरणाच्या वेदना कांहीं वेळ विसरला व अगदीं आनंदित झाला. त्या आनंदांत अश्वत्थाम्याला त्यानें आपला शेवटचा सेनापति नेमलें! मग ते तिघे तेथून पांडवांचा नाश करण्याकरितां निघून गेले.

---

# १० सौप्तिकपर्व.

कृपाचार्य, अश्वत्थामा व कृतवर्मा हे तिघे कौरवांकडील वीर रात्र काढण्याकरितां एका वडाच्या झाडाखालीं येऊन बसले. थकल्यामुळें कृपाचार्य व कृतवर्मा या दोघांना लवकरच गाढ झोंप लागली. पण पूर्वीच्या सगळ्या गोष्टी मनांत घोळत असल्यामुळें अश्वत्थाम्यास कांहीं केल्या झोंप म्हणून येईना. दुर्योधनाजवळ आपण आतांच केलेली प्रतिज्ञा शेवटास कशी न्यावी, व आपल्या बापाच्या वधाचा व पांडवांच्या इतर कपटी कृत्यांचा सूड कसा घ्यावा, ही तळमळ त्याला लागली होती. इतक्यांत एक घुबड हळूच तेथें आलें; व त्या वडाच्या आश्रयानें हजारों कावळे तेथें रात्रींचा विसांवा घेत होते, त्यांना हळुहळू मारण्याचा त्यानें सपाटा चालविला. हें अश्वत्थाम्यानें जेव्हां पाहिलें, तेव्हां पांडव रात्रीं बेसावध असतांना त्यांचा असाच तूं सूड घे, असें तें घुबड आपणास गुरूपदेशच

देत आहे, असें त्यास वाटलें. त्यानें तत्काळ कृपाचार्य व कृतवर्मा यांना जागे केलें व आपला विचार त्यांना कळविला. पण, पांडव निजले असतां त्यांचेवर गुप्तपणें छापा घालून त्यांना मारणें हें वीराचें काम नव्हे, हा अधर्म आहे, असें त्या दोघांनीं सांगितलें. व ते त्या गोष्टीस कबूल होतना. तेव्हां अश्वत्थामा एकटाच त्वेषानें पांडवांच्या शिबिराकडे निघाला. त्याचेमागून मग ते दोघेही त्याला साहाय्य करण्याकरितां गेले. पांडवांच्या छावणींत पोहोंचल्यावर त्या तिघांनीं असें ठरविलें कीं, अश्वत्थाम्यानें आंत शिरून सर्वांची कत्तल करावी, व कृपाचार्य व कृतवर्मा यांनीं दाराशीं उभे राहून बाहेर पळून जाण्याचा प्रयत्न करतील त्यांचा वध करावा. आपल्या पित्याचा वध करणारा जो धृष्टद्युम्न त्यालाच पहिल्यानें ठार करावयाचें, असा बेत करून अश्वत्थामा आंत शिरला. आणि सपाट्या-बरोबर जोरानें एक लाथ मारून त्यानें त्यास जागा केलें. व खूप लाथाबुक्क्या मारून त्यास ठार केलें ! नंतर तो बाकीच्या वीरांवर घसरला,

व त्यांचीही सर्वांची त्यानें तशीच वाट लावली. जे बाहेर जीवरक्षणार्थ पळूं लागले, त्यांचा संहार कृपाचार्य व कृतवर्मा या दोघांनीं दारांतच करून टाकला ! नंतर ही आनंदाची बातमी त्या तिघांनीं जाऊन दुर्योधनास कळविली. त्या वेळीं दुर्योधनाचे प्राण अगदीं कंठीं आले होते. तरी त्याला ही बातमी ऐकून हर्ष झाला. नंतर अश्वत्थाम्याला मनापासून शाबासकी देऊन त्यानें मोठ्या समाधानानें प्राण सोडला.

श्रीकृष्ण, सात्यकि व पांच पांडव हे या कत्तलींत खरें म्हटलें म्हणजे सांपडले नाहींत; कारण ते त्या रात्रीं तेथ मुळीं नव्हतेच. द्रौपदीचे पुत्र व पांडवांकडील इतर वीर हेमात्र मारले गेले. धृष्टद्युम्नाचा एक सारथि सुदैवानें त्या तडाक्यांतून निसटून गेला होता. त्यानें दुसऱ्या दिवशीं सकाळीं ही दुःखकारक बातमी पांडवांना कळविली. त्या वेळीं ते दुःखानें अगदीं बेशुद्ध झाले ! नंतर नकुलानें जाऊन द्रौपदीला तेथें आणलें. ती आल्याबरोबर शोकानें मूर्छित पडली ! सावध झाल्यावर ती संतापानें म्हणाली, ‘ अश्व-

त्थाम्याला ठार करून या कृत्याचा सूड जोंपर्यंत तुम्हीं उगविला नाहीं, तोंपर्यंत मी तोंडांत पाणीही घालणार नाहीं. त्याचे डोक्यावर जो एक जन्मापासून तेजस्वी मणि आहे, तो आणून मला दाखवा म्हणजे माझें समाधान होईल. "
मुख्यतः **भीमाला** तिनें हा सूड घ्यावयास सांगितलें. त्याप्रमाणें **भीम नकुलास** सारथि करून आवेशानें अश्वत्थाम्याचा पाठलाग करीत निघाला. अश्वत्थामा अस्त्रविद्येंत श्रेष्ठ आहे, त्याच्याबरोबर एकट्या **भीमाचा** टिकाव लागावयाचा नाहीं, असें **श्रीकृष्णानें** सुचविल्यावरून **श्रीकृष्ण**, **अर्जुन** व **युधिष्ठिर** हे **भीमाचे** पाठोपाठ गेले. लवकरच अश्वत्थाम्याची व त्यांची गांठ पडली. तेव्हां अश्वत्थाम्यानें घाबरून ब्रह्मशिर नांवाचें एक भयंकर अस्त्र **पांडवांवर** सोडलें. अर्जुनानें उलट तसेंच अस्त्र सोडलें. हीं दोन्ही अस्त्रें भयंकर असल्यामुळें सर्व पृथ्वीवर त्यांनीं भयंकर भडका उडविला ! तेव्हां **व्यास** व **नारद** तेथें आले. व हीं अस्त्रें सोडल्याबद्दल त्यांनीं दोघांनाही दोष दिला. तेव्हां अर्जुनानें आपलें अस्त्र परत घेतलें.

अश्वत्थाम्याला तें परत घेतां येईना! फक्त त्यानें तें पांडवांवरून काढून पांडवांच्या वंशांतील स्त्रियांच्या पोटीं जे गर्भ होते त्यांवर सोडलें! तेव्हां या बालहत्येच्या पातकाबद्दल तुझ्या अंगांतून अनेक वर्षें पू व रक्त वाहात राहील; व तूं जंगलांत भटकत फिरशील; असा श्रीकृष्णानें त्याला शाप दिला! मग, आपल्या मस्तकावरचा मणि तूं धर्मराजास मुकाट्यानें काढून दे व येथून निघून जा, असें श्रीव्यासांनीं त्याला सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें केलें. पांडवांनीं तो मणि नंतर द्रौपदीला आणून दिला; तेव्हां तिचें समाधान झालें.

---

# ११ स्त्रीपर्व.



कौरवांकडचे बहुतेक सगळे वीर कुरुक्षेत्राच्या मैदानावर मारले गेले, ही दुःखकारक बातमी युधिष्ठिराच्या विनंतीवरून श्रीकृष्णानें हस्तिनापुरास जाऊन राजवाड्यांत कळविली. व धृतराष्ट्र आणि गांधारी यांचें त्यानें चार सम-

जुतीच्या गोष्टी सांगून समाधान केलें. तरी या सर्व नाशाला मूळ श्रीकृष्णच कारण आहे, असें जाणून गांधारीनें, तुझ्या कुळाचा असा लवकरच नाश होईल, असा त्याला दुःखाच्या पहिल्या झटक्यांत शाप दिला. तीच युद्धाची हकीकत संजयाचे तोंडून पुन्हा सविस्तर ऐकल्यानंतर धृतराष्ट्र व गांधारी यांचा शोक अनावर झाला. तेव्हां विदुरानें त्यांचें आपलेकडून समाधान केलें. ही युद्धांतील भयंकर बातमी कौरवांचे अंतःपुरांत जेव्हां पोंचली, तेव्हां कौरवस्त्रियांच्या आक्रोशानें तें अगदीं दणाणून गेलें. सर्व हस्तिनापुरांतही या प्रसंगानें अगदीं आकांत उडून राहिला. कोणी बापाकरितां, तर कोणी पतीकरितां, कोणी पुत्राकरितां, तर कोणी नातवाकरितां शोक करीत आहेत, असा देखावा जिकडे तिकडे दिसूं लागला. धृतराष्ट्र व विदुर हे, गांधारी, कुंति व कौरवांच्या स्त्रिया यांना बरोबर घेऊन नंतर कुरुक्षेत्राकडे जाण्यास निघाले. आपल्या माणसांच्या प्रेतांचें तरी एकदां शेवटचें दर्शन घ्यावें, असा त्यांचा हेतु होता.

अंगावर दागिने नाहींत, सर्वांचे केश मोकळे सुटलेले आहेत, अशा त्या कौरवांच्या स्त्रिया शोक करीत जेव्हां हस्तिनापूरच्या रस्त्यांतून जाऊं लागल्या, तेव्हां नगरांतील स्त्रीपुरुषांना पराकाष्ठेचें दुःख झालें. धृतराष्ट्र वगैरे मंडळी येत आहे, असें ऐकून युधिष्ठिर आपल्या सर्व माणसांस घेऊन त्यांना समोरा गेला. सगळ्यांच्या भेटी झाल्यावर युधिष्ठिरानें जाऊन आपलें मस्तक धृतराष्ट्राचे पायांवर ठेविलें. धृतराष्ट्रानें त्यास उठून आलिंगन दिलें. नंतर तो भीम कोठें आहे, अशी चौकशी मोठ्या उत्सुकतेनें करूं लागला. तेव्हां, याच्या मनांत कांहीं तरी पापबुद्धि उत्पन्न झाली आहे, असें श्रीकृष्णानें ताडलें. व भीम पायां पडून त्याला आलिंगन देण्यासाठीं पुढें जात आहे, तोंच श्रीकृष्णानें त्याला बाजूस ओढलें; व दुर्योधनानें पूर्वी केलेली भीमाची लोखंडी मूर्ति त्यानें पुढें केली! तो भीमच आहे, असें समजून धृतराष्ट्रानें त्याचा सूड घेण्याकरितां तिला त्वेषानें कवटाळलें. धृतराष्ट्राचें सामर्थ्य फारच मोठें होतें; म्हणून त्याच्या त्या जबरदस्त मिठीनें

ती मूर्ति चूर होऊन खालीं पडली! त्याच्या छातीलाही इजा होऊन तो रक्त ओकत जमिनीवर पडला. तो सावध झाल्यावर श्रीकृष्णानें त्याची चांगली कानउघाडणी केली. तेव्हां त्याला आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप झाला. आपले हातून पातक होणार होतें. तें श्रीकृष्णानें टाळलें, याबद्दल त्यानें त्याचे फार उपकार मानले. व पांडवांवर मी आपल्या मुलांप्रमाणें प्रेम करीन, असें त्यानें कबूल केलें. नंतर सगळी मंडळी जाऊन गांधारीस भेटली. पहिल्यानें या मंडळीला पाहून तिच्या अंगाचा अगदीं संताप झाला. पण कांहीं वेळानें तो तिचा क्रोध शांत होऊन तिनें सर्व पांडवांस जवळ घेऊन मातेप्रमाणें कुरवाळलें! मग पांडव व द्रौपदी हीं कुंतीकडे गेलीं. मागचीं सगळीं दुःखें आठवून सर्वांना रडें कोसळलें. नंतर एकमेकांनीं एकमेकांचें कसेंबसें समाधान केलें. यानंतर सर्व मंडळी कुरुक्षेत्रावर आली. तेथें सर्वांच्या प्रेतांचें युधिष्ठिरानें दहन करविलें. तो विधि आटोपल्यावर सगळीं भागीरथीवर आलीं व तेथें सर्वांच्या क्रिया झाल्या. कर्ण हा

तुमचा भाऊच होता, असें या वेळीं कुंतीनें युधिष्ठिरास सांगितल्यावरून त्यानें अत्यंत दुःखानें त्याचीही क्रिया केली.

## १२ शांतिपर्व.

गंगेच्या कांठीं आप्तांच्या क्रिया केल्यानंतर कांहीं दिवस सगळी मंडळी तेथेंच राहिली. नारद व इतर ऋषि तेथें त्यांच्या समाचारास आले. युद्धाच्या धडाक्यामध्यें युधिष्ठिराचे मनास फारसें वाईट वाटलें नाहीं; पण तें संपल्यावर झाल्या गोष्टीबद्दल त्याच्या मनाला दुःख व पश्चात्ताप होऊं लागला. कर्णासारखा शूर, पराक्रमी व उदार वडील भाऊ आपल्या हातून मरण पावला, याचें तर त्याला अतिशयच वाईट वाटलें. भिकार राज्याकरितां आपण आपल्या कुळाचा, हजारों क्षत्रियांचा, कर्णासारख्या भावाचा व कौरवांचा नाश केला, ही गोष्ट त्याचे मनास फारच टोंचूं लागली. असें हें अनेकांचा नाश करून मिळविलेलें राज्य अर्जुनास देऊन आपण

अरण्यांत तप करण्यास जावें, असेंही त्याचे मनांत आलें. पण, श्रीकृष्ण, अर्जुन, भीम व ऋषि यांनीं त्याची अनेक प्रकारें समजूत घातली तेव्हां शेवटीं तो राज्याभिषेक करून घेण्यास कबूल झाला. नंतर सर्व मंडळी मोठ्या थाटानें हस्तिनापुरास आली. तेरा वर्षांनीं परत आलेल्या या शूर राजपुत्रांस पाहून प्रजेला फारच आनंद झाला. नंतर सुमुहूर्तावर युधिष्ठिरास सिंहासनावर बसवून श्रीकृष्णानें आपल्या हातानें आपल्या पांचजन्य शंखांतील पवित्र उदकानें त्यास अभिषेक केला! नवीन सर्व अधिकारी नेमून धृतराष्ट्राच्या विचारानें तो राज्याचा कारभार चालवूं लागला. युद्धांत पडलेल्या लोकांची आटवण राहावी म्हणून त्यांच्या नांवानें त्यानें जागोजाग धर्मशाळा, पाणपोया, अन्नछत्रें, तळीं व विहिरी हीं बांधलीं. युद्धांत मरण पावलेल्या वीरांच्या अनाथ बायकांचें व मुलांचें त्यानें पालनपोषण केलें. त्यानें एकंदरींत धर्मानें व प्रजेच्या सुखाकडे लक्ष देऊन राज्य चालविल्यामुळें प्रजा फार संतुष्ट झाली.

———

# १३ अनुशासनपर्व.

राज्याभिषेकानंतर कांहीं दिवसांनीं युधिष्ठिर श्रीकृष्णाचे भेटीस गेला. त्या वेळीं श्रीकृष्ण कोणाचें तरी ध्यान करीत आहे, असें त्याला दिसून आलें. तेव्हां त्यानें श्रीकृष्णाला त्या विषयीं प्रश्न केला. त्यावर श्रीकृष्णानें असें सांगितलें कीं, भीष्म या वेळीं माझें ध्यान करीत आहे, म्हणून माझें मन त्याच्याकडे लागलें आहे. नंतर पांडव व श्रीकृष्ण रथांत बसून रणभूमीवर जेथें भीष्म पडला होता, तेथें गेले. तेथें गेल्यावर भीष्माच्या प्रकृतीविषयीं विचारपूस करून श्रीकृष्ण म्हणाला, 'युद्धांत आपल्या हातून अनेक भाऊबंदांचा नाश झाल्याबद्दल या युधिष्ठिराच्या मनाची तळमळ अद्याप जात नाहीं. तरी तूं राजधर्म, क्षत्रियधर्म, नीति वगैरे विषयांचा याला बोध कर, म्हणजे याचें चित्त शांत होईल.' या श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणें उत्तरायण सुरू होईपर्यंत ५६ दिवस त्यानें पांडवांना अनेक विषयांवर गोडसा उपदेश केला. युधिष्ठिर

प्रश्न करी व भीष्म त्याचें उत्तर देई, असा क्रम नित्य ५६ दिवसपर्यंत चालला होता. त्या उपदेशाचें तात्पर्य असें:—

**युधिष्ठिर**:—राजा कसा असावा?

**भीष्म**:—राजाची धर्मावर निष्ठा असावी. प्रजेच्या कल्याणासाठीं त्यानें नित्य देवार्चा व साधु पुरुषांची पूजा करावी. राजानें सत्य कधींही सोडूं नये. कोणत्याही कामांत अपयश आल्यास त्यानें दुप्पट हिंमतीनें प्रयत्न करून तें काम तडीस न्यावें. त्यानें प्रजेशीं न्यायानें वागावें. पण प्रजेशीं त्याचें वर्तन फाजील सौम्य किंवा फाजील कडक असूं नये. त्यानें लोकांच्या हितासाठीं झटावें, सरळ वागावें, व आपलें मन नेहमीं आपल्या ताब्यांत ठेवावें. त्याचें मन संशयी नसावें, प्रजेवर त्याचा विश्वास असावा. त्यानें प्रजेचें रक्षण मोठ्या दक्षतेनें करावें. राजानें स्वतां कोणाजवळ कांहीं मागूं नये; पण जे आपलेजवळ मागतील त्यांच्या इच्छा तृप्त कराव्या. प्रजेपासून अन्यायानें राजानें पैसा घेऊं नये. कसाही प्रसंग आला, तरी आपलें कर्तव्य कर-

ण्यास त्यानें चुकूं नये. त्यानें आपल्या सुखाकडे पाहूं नये, प्रजेच्या सुखाकडे पाहावें. त्याचें मन मोठं व अंतःकरण दयाळू असावें. तो पंडितांचा मान ठेवणारा असावा. त्यानें शेतकरी व व्यापारी यांना संतुष्ट व सुखी ठेवावें. **प्रजेचा संतोष जो राजा राखतो त्याच्याच राज्याला बळकटी येते.**

**युधिष्ठिरः**—एक मनुष्य राजा होऊन सर्वांवर सत्ता कां चालवितो? राजा नसेल तर काय होईल?

**भीष्मः**—पहिल्यानें राजा असा कोणी नव्हता. सर्व लोक एकमेकांशीं धर्मानें, नीतीनें व न्यायानें वागत असत. कोणावर प्रसंग आला, तर त्याच्या उपयोगीं पडत. कोणावर कांहीं संकट आलें, तर त्याचें रक्षण करीत. आपसांत भांडणतंटा, लबाडी किंवा कपट करीत नसत. सर्व अगदीं गुण्यागोविंदानें राहात. एकमेकांवर प्रेम करीत. असें होतें तोंपर्यंत एकानें दुसऱ्यावर अंमल करण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण पुढें कांहीं लोक लबाड, दुष्ट, लोभी व व्यसनी झाले,

व ते गरीब व सदाचारी लोकांना पीडा देऊं लागले. बऱ्याच लोकांवर त्यांचा जुलूम होऊं लागला. तेव्हां जो स्वतां न्यायानें व धर्मानें वागेल व वाईट काम करणारांची खोड मोडण्याचें सामर्थ्य ज्याचे अंगीं असेल, अशा एका माणसाची म्हणजे राजाची जरूर वाटूं लागली. मूळ राजे असे उपत्न्न झाले. दुष्टांचें शासन करण्याला देशांत राजा नसेल, तर चांगल्या मार्गानें चालणाऱ्या लोकांना फार त्रास पोंचतो. ज्या देशांत राजा नाहीं, त्या देशाचा नाश होतो.

**युधिष्ठिरः**—मनुष्याचा धर्म कोणता ?

**भीष्मः**—मनुष्यानें नेहमीं मनांत परमेश्वराविषयीं भक्ति ठेविली पाहिजे. तसेंच, आई, बाप व गुरु यांना पूज्य मानणें हें मनुष्याचें मुख्य कर्तव्य आहे. त्यांच्या आज्ञेबाहेर तिळमात्रही जाणें चांगलें नाहीं. त्यांच्याशीं नेहमीं मर्यादेनें वागावें. पित्यापेक्षां—नव्हे सर्व जगापेक्षां—मातेची योग्यता मोठी आहे. गुरूची योग्यता तर सगळ्यांत ज्यास्त आहे. कारण, मातापिता हीं जन्म देतात व पालन-पोषण करितात; पण गुरु

मनुष्याला खरें मनुष्यत्व देतो. म्हणजे तो मनुष्याला उत्तम उपदेश करितो, चांगल्या मार्गाला लावितो व मोठ्या योग्यतेस चढवितो.

दया हें सर्व धर्माचें सार आहे. जसा आपला जीव तसाच दुसऱ्याचा जीव. आपल्याला जसें सुखदुःख होतें तसेंच दुसऱ्यालाही होतें. म्हणून मनुष्यानें दुसऱ्या कोणत्याही जीवाला दुःख तर देऊं नयेच; पण दुसऱ्याला जर दुःख होत असेल, तर तें नाहींसें करण्याचा होईल तेवढा प्रयत्न करावा.

मनुष्यानें अहंकार म्हणजे गर्व कधींही बाळगूं नये. गर्वानें सगळ्याचा नाश होतो. खोट्याची सावलीही घेऊं नये. सर्व सद्गुणांत सत्य हेंच श्रेष्ठ आहे. सर्व चांगल्या गुणांची उत्पत्ति एकट्या सत्यापासून आहे. म्हणून सत्य कधींही सोडूं नये.

युधिष्ठिरः—ईश्वर कसा व कोठें आहे ?

भीष्मः—ईश्वर अनंत आहे. म्हणजे त्याला आदि व अंत हीं नाहींत. हें सर्व जग त्यानेंच उत्पन्न केलें असून तो त्यांत सर्वत्र भरून राहिला

आहे. मनुष्याला सुख, दु:ख, राग, लोभ, वगैरे विकार होतात; तसे त्याला कांहीं होत नाहींत. मनुष्याच्या अंगांत जोंपर्यंत अज्ञान आहे, तोंपर्यंत त्याचें खरें स्वरूप त्याला कळणार नाहीं. साधु पुरुषांचे ठिकाणीं अज्ञान नसतें, म्हणून ईश्वराला ते जाणतात. अज्ञान घालविण्याविषयीं मनुष्यानें त्याची निरंतर मनापासून प्रार्थना केली, म्हणजे त्याच्यावर तो कृपा करितो, त्याचें अज्ञान नाहींसें करितो व त्याला आपलें रूप दाखवितो.

**युधिष्ठिरः**—तप म्हणजे काय ?

**भीष्मः**—दुसऱ्याला देहानें, वाणीनें किंवा मनानें न दुखविणें, दुसऱ्याचें बरें करण्याविषयीं झटणें, सत्यावर प्रेम करणें व सर्व प्राण्यांवर नेहमीं दया करणें, हें खरें तप आहे. उपासतापास व व्रतें करून देहाला कष्ट देणें हें कांहीं खऱ्या तपाचें लक्षण नव्हे. बाहेरच्या लक्षणांपेक्षां **मन पापी विचारांपासून शुद्ध ठेवणें व संसार करीत असतांना परमेश्वराला कधींही न विसरणें हीं आंतील लक्षणेंच खरीं आहेत.**

**युधिष्ठिरः**—उद्योग श्रेष्ठ कीं दैव श्रेष्ठ ?

**भीष्मः**—दैवापेक्षां उद्योगच श्रेष्ठ आहे. कारण, ज्याला दैव म्हणून म्हणतात तें तरी मनुष्यानें मागील जन्मीं केलेल्या कर्मांचेंच म्हणजे उद्योगाचेंच फळ आहे. मागील जन्मीं मनुष्यानें जसें बरें वाईट कर्म केलें असेल, तसें बरें किंवा वाईट फळ त्याला या जन्मीं भोगावें लागतें. मनुष्याच्या हातून जें जें कर्म घडतें त्याचें त्याचें फळ त्याला आज नाहीं उद्यां, या जन्मीं नाहीं पुढील जन्मीं भोगल्याशिवाय सुटका नाहीं. तेव्हां सतत चांगला उद्योग करीत राहणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे. तसें त्यानें केलें कीं त्याचें दैव चांगलें झालें.

**युधिष्ठिरः**—युद्धास उभा राहिलेल्या क्षत्रियाचें कर्तव्य काय ?

**भीष्मः**—धर्मानें युद्ध करावें. युद्ध करितांना द्वेष, सूडाचे विचार किंवा क्रोध मनांत ठेवूं नये. युद्धांत मरण आलें तरी पतकरावें, पण कपटानें जय कधीं मिळवूं नये. **अन्यायानें मिळालेला जय फार काळ टिकत नाहीं.** शस्त्रें विषांत

बुडवूं नयेत. ज्याचें शस्त्र मोडलें किंवा पडलें, त्याच्यावर शस्त्र उचलूं नये. जो शत्रु संकटांत आहे, भ्याला आहे, शरण आला आहे, किंवा ज्यानें शस्त्र खालीं ठेवलें आहे, त्याशीं युद्ध करूं नये.

युद्धांत आपल्यासमोर जो उभा राहील त्याच्याशीं लढाई करून त्याला मारणें किंवा जिंकणें हा क्षत्रियाचा धर्म आहे. प्रत्यक्ष आपला बाप, भाऊ अथवा गुरु जरी लढाईत पुढें आला, तरी त्याला मारल्यापासून क्षत्रियाला कांहीं पाप लागत नाहीं.

याप्रमाणें उत्तरायणास प्रारंभ होईपर्यंत नाना विषयांवर भीष्मानें पांडवांस उपदेश केला. नंतर दुष्ट पुत्रांच्या मरणाबद्दल शोक करीत न बसतां पांडवांचें चांगलें पालन करून राहिलेले आयुष्याचे दिवस काढण्यास त्यानें धृतराष्ट्रास सांगितलें. व आपलें सर्व चित्त श्रीकृष्णाकडे लावून त्यानें आपला प्राण सोडला.

---

# १४ अश्वमेधपर्व.

गंगेच्या पवित्र तीरीं भीष्माचा शेवटचा विधि आटोपून परत येतांना युधिष्ठिराचें अंतःकरण दुःखानें अगदीं भरून आलें. जमिनीवर आंग टाकून देऊन एकाद्या स्त्रीप्रमाणें तो अतिशय शोक करूं लागला ! आपल्या हातून कुळाच्या नाशाचें भयंकर पातक घडलें, हा विचार त्याच्या अंतःकरणाला सारखा जाळीत होता. मेलेल्या माणसांसाठीं शोक केला, तर त्यांच्या आत्म्यांस दुःख होतें, असें सांगून श्रीकृष्णानें त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. तरी त्याचा शोक सुटेना. तेव्हां श्रीव्यासांनीं असें सुचविलें कीं, तूं अश्वमेध कर म्हणजे तुझ्या मनाची ही तळमळ व दुःख नाहींसें होईल. पण युद्धानें सर्व प्रजा हैराण झाली होती व खजिना रिकामा पडला होता ! आधींच हैराण झालेल्या प्रजेवर यज्ञासाठीं जास्त कर बसविणें युधिष्ठिरास पसंत पडेना. तेव्हां श्रीव्यासांनीं असें सुचविलें कीं, पूर्वीं एका राजानें हिमालय पर्वतावर यज्ञ केला

होता; त्या यज्ञांतील द्रव्य तेथें अजून तसेंच जमिनींत पुरलेलें आहे, तें आणून यज्ञ करावा. या मसलतीनें युधिष्ठिराचें समाधान झालें व तो हस्तिनापुरास परत आला. तेथें कांहीं दिवस राहून श्रीकृष्ण द्वारकेस गेला. व हिमालयांतून यज्ञाकरितां द्रव्य आणण्यासाठीं पांडवही तिकडे निघून गेले. तेथें पोहोंचल्यावर पहिल्यानें त्यांनीं महादेवाची मोठ्या भक्तीनें पूजा केली व मग जमीन खणण्यास आरंभ केला. तेथें त्यांना महादेवाच्या कृपेनें विपुल धन मिळालें. तें सर्व घेऊन हळुहळू मुक्काम करीत ते हस्तिनापुराला येण्यास निघाले.

---

## परीक्षितीचा जन्म.

इकडे अभिमन्यूची दुर्दैवी पत्नी उत्तरा प्रसूत होण्याचा समय आला, हें जाणून श्रीकृष्ण द्वारकेहून तेथें आला. उत्तरा प्रसूत होऊन तिला पुत्र झाला, पण तो जन्मतांच मेला! युद्धांत पांडवांचे सर्व पुत्र मरण पावले होते, त्यामुळें

त्यांच्या घरांतील सर्व स्त्रिया उत्तरेला मुलगा होईल, ही आशा धरून बसल्या होत्या. पण अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें तो कुळाचा अंकुर करपून गेलेला पाहून सर्वांना अत्यंत दुःख झालें. उत्तरा तर शोकानें वेडी होऊन गेली! आतां आपल्या आवडत्या भाचाच्या मुलास जिवंत कर, अशी दीन वाणीनें सर्व स्त्रियांनीं श्रीकृष्णाची प्रार्थना केली. तेव्हां श्रीकृष्णानें आपल्या दिव्य सामर्थ्यानें त्याला जिवंत केलें. तेव्हां जिकडे तिकडे आनंदी-आनंद झाला! त्या मुलाचें नांव परीक्षिति असें ठेविलें.

---

## अश्वमेध.



परीक्षितीचा जन्म होऊन एक महिना लोटल्यावर पांडव हिमालयावरील अगणित धन घेऊन हस्तिनापुरास आले. तेव्हां परीक्षितीची एकंदर हकीगत ऐकून त्यांना अत्यानंद झाला. नंतर श्रीकृष्ण व श्रीव्यास यांच्या आज्ञेनें युधिष्ठिरानें अश्वमेधाला आरंभ केला. उत्तम जातिवंत काळा घोडा आणून तो पृथ्वीवर मोकळा सोडला.

त्याचें रक्षण करण्याकरितां अर्जुन सैन्य घेऊन त्याच्यामागून निघाला. ज्या देशांत हा घोडा जाई तेथील राजापासून अर्जुन युधिष्ठिराच्या नांवानें खंडणी घेत असे; त्यानें ती खुषीनें न दिल्यास त्याला युद्धांत जिंकून अर्जुन त्याच्यापासून ती वसूल करी. असें होतां होतां घोडा मणिपुरास आला. अर्जुनाचा पुत्र बभ्रुवाहन हा तेथील राजा होता. हा घोडा आपल्या पित्याचा आहे, हें माहीत नसल्यामुळें बभ्रुवाहनानें तो धरून ठेवला. त्यामुळें बापलेकांचें युद्ध झालें! त्यांत बभ्रुवाहनाचे हातून अर्जुनाचा वध झाला! परंतु अर्जुनाची पत्नी नागकन्या उलूपी हिनें एक दिव्य मणि आणून त्याला पुन्हा जिवंत केलें! नंतर यज्ञाचे वेळीं बभ्रुवाहनास येण्यास सांगून अर्जुन पुढें गेला. व अनेक राजांना जिंकून व अगणित खंडणी घेऊन तो घोड्यासह हस्तिनापुरास परत आला. मग युधिष्ठिरानें मोठ्या थाटानें यज्ञ पुरा केला.

---

# १५ आश्रमवासिकपर्व.

आपल्या शंभर पुत्रांच्या मरणाचें दुःख गिळून धृतराष्ट्र पांडवांजवळ सुखानें राहिला होता. पांडव, संजय, विदुर वगैरे मंडळी, धृतराष्ट्राला आपल्या पुत्रांचें स्मरण होणार नाहीं, अशा बेतानें अगदीं जपून वागे. कुंति, द्रौपदी, सुभद्रा याही गांधारीच्या सेवेंत दक्ष असत. धृतराष्ट्राला आपलेकडून होईल तेवढें सुख देण्यांत युधिष्ठिर अगदीं हयगय करीत नसे. भीमाचे मनांतूनमात्र धृतराष्ट्राचीं पूर्वींचीं दुष्ट कृत्यें गेलीं नव्हतीं. युद्ध होऊन पंधरा वर्षें झाल्यावर, आपण आतां वनांत जाऊन ईश्वराचें चिंतन करण्यांत काळ घालवावा, असें धृतराष्ट्रास वाटलें. पांडवांस त्यानें तसें सांगितलेंही. तें ऐकून युधिष्ठिरास फार वाईट वाटलें. आपण येथेंच राहावें, वनांत जाऊं नये, असा त्यानें धृतराष्ट्रास पुष्कळ आग्रह केला. पण तो ऐकेना. इतक्यांत धृतराष्ट्राचे निश्चयाच्याआड तूं येऊं नको, असें श्रीव्यासांनींही सुचविल्यामुळें युधिष्ठिरानें मग

फारसा आग्रह धरिला नाहीं. त्याप्रमाणें नगरांतील सर्व लोकांचा व पांडवांचा प्रेमानें निरोप घेऊन व वल्कलें नेसून धृतराष्ट्र अरण्यांत जाण्यास निघाला. संजय व विदुर हेही त्याच्याबरोबर निघाले. कुंतीही गांधारीबरोबर जाण्यास तयार झाली. सर्व हस्तिनापुर त्यांना पोंचविण्यास बाहेर पडलें. नगराबाहेर लांबपर्यंत पोहोंचविल्यानंतर पांडव व इतर लोक त्यांचा निरोप घेऊन दुःखानें परत आले.

---

## कुंतीच्या भेटीकरितां पांडव वनांत जातात.

धृतराष्ट्र, विदुर, संजय, गांधारी व कुंती हीं भागीरथीचे कांठीं एका आश्रमांत जाऊन राहिलीं. नंतर बरेच दिवस गेले; तरी पांडवांचें मन स्वस्थ होईना. कशांतच त्यांना गोडी वाटेनाशी झाली. आपली वृद्ध माता, धृतराष्ट्र व गांधारी यांची वनांत काय स्थिति झाली असेल, हें मनांत येऊन त्यांना चैन पडेनासें झालें. तेव्हां सहदेवानें सुचविल्यावरून सर्व पांडव नगरांतील

शेंकडों लोकांसह कुंतीस भेटण्यासाठीं गेले. सर्वांच्या भेटी होऊन सर्वांना आनंद झाला. विदुर तेथें कोठें दिसला नाहीं, म्हणून युधिष्ठिर धृतराष्ट्राजवळ त्याची चौकशी करीत होता. इतक्यांत दूर अंतरावर तो त्याच्या दृष्टीस पडला. युधिष्ठिर तिकडे धांवत गेला. पण दोघांची गांठ पडल्याबरोबर कांहीं न बोलतां विदुरानें प्राण सोडला! युधिष्ठिरानें परत येऊन सर्वांस ही हकीगत सांगितली; तेव्हां सगळ्यांना आश्चर्य व दुःख वाटलें.

या मंडळीला जाऊन सुमारें एक महिना झाल्यावर श्रीव्यास तेथें आले. युद्धांत मरण पावलेल्या आपल्या मुलांची पुढें काय अवस्था झाली आहे, हें जाणण्याची धृतराष्ट्रास इच्छा उत्पन्न झाली. कुंतीला कर्णाचें, सुभद्रा व द्रौपदी यांना आपल्या पुत्रांचें व कौरवस्त्रियांस आपापल्या पतींचें पुन्हा एकदां दर्शन व्हावें, असेंही वाटूं लागलें. तेव्हां श्रीव्यासांनीं सर्वांना गंगातीरीं नेऊन तेथें आपल्या दिव्य शक्तीनें सर्वांच्या इच्छा तृप्त केल्या! नंतर ज्यांना आपल्या पतीं-

बरोबर जावयाचें असेल, त्यांनीं भागीरथींत आतां शिरावें, असें श्रीव्यासांनीं सांगितल्यावरून कौरवांच्या व इतर क्षत्रियांच्या स्त्रियांनीं नदींत उड्या टाकल्या ! कांहीं दिवसांनीं पांडव हस्तिनापुरास परत आले. यानंतर दोन वर्षांनीं एक दिवस नारदांनीं येऊन पांडवांना कळविलें कीं, धृतराष्ट्र, गांधारी व कुंती हीं वणव्यांत सांपडून जळून मेलीं. हें वर्तमान ऐकून पांडव, द्रौपदी व सुभद्रा यांच्या दुःखाला पारावार राहिला नाहीं ! सगळीं मोठ्यानें आक्रोश करूं लागलीं. नंतर आपलें दुःख आवरून तीं गंगातीरीं गेलीं व तेथें त्यांनीं त्यांची क्रिया केली.

---

# १६ मौसलपर्व.



कुरुक्षेत्रावरील युद्धाला छत्तीस वर्षें झालीं. गांधारीनें दुःखाच्या भरांत श्रीकृष्णाला जो शाप दिला होता, तो पुरा होण्याची वेळ जवळ आली. तेव्हां भलत्याच माणसांची थट्टा करण्याची कुबुद्धि यादवांना उत्पन्न झाली. विश्वामित्र,

कण्व, नारद, वगैरे ऋषि एकदां द्वारकेला आले होते. तेव्हां सांबाला बायकोचा वेष देऊन त्यांनीं ऋषींकडे नेलें, व या बाईला मुलगा होईल कीं मुलगी होईल, असें त्यांना विचारलें. ऋषींनीं आपल्या ज्ञानानें खरा प्रकार ओळखला व याला एक लोखंडाचें मुसळ होईल, आणि तें सर्व यादवांचा संहार करील, असें त्यांनीं रागानें सांगितलें. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सांबास मुसळ झालें. बभ्रुराजानें त्याचें पीठ करवून तें समुद्रांत टाकविलें. आतां तें काय करतें? असा विचार करून ते स्वस्थ झाले. तथापि नाशाचा दिवस जसा अगदीं जवळ येऊं लागला, तशीं चोहोंकडे दुश्चिन्हें दिसूं लागलीं. श्रीकृष्णाचें सुदर्शन चक्र एकदम आकाशांत निघून गेलें, रथासह घोडे पळून गेले, आणि बळरामाचा ध्वज अप्सरांनीं नेला! नंतर सगळे यादववीर प्रभासतीर्थावर यात्रेला जमले असतां ते सर्व दारू पिऊन एकमेकांशीं भांडूं लागले. होतां होतां हातघाई सुरू होऊन चोहोंकडे एकच दंगा उसळला. तेव्हां समुद्राचे किनाऱ्यावरील लव्हाळे

घेऊन ते एकमेकांस मारूं लागले ! पण ऋषींच्या शापानें ते लव्हाळेच शस्त्राप्रमाणें होऊन चोहों-कडे यादव मरून पडले ! याच वेळीं श्री-कृष्णानें मूठभर गवत घेऊन वर फेंकलें; पण तेंही वज्राप्रमाणें होऊन त्यानें राहिलेले यादव ठार झाले ! इतक्यांत बळरामानें, आतां वाईट समय आला आहे असें जाणून, शरीराचा त्याग केला ! श्रीकृष्णाचाही एका व्याधाचे हातून वध झाला ! ही हकीगत पांडवांना समजली, तेव्हां त्यांना फार दुःख झालें. द्वारकेंतील पोरक्या मुलांना व विधवा स्त्रियांना अर्जुनानें हस्तिना-पुरास आणलें, व त्यांची नीट व्यवस्था लावून दिली. वृष्णीकुळांत फक्त श्रीकृष्णाचा नातू व्रज हा उरला होता. त्याला त्यांनीं इंद्रप्रस्थाचें राज्य दिलें. एकंदर सर्व चिन्हांवरून आपलाही मरण-काळ जवळच आला आहे, असें जाणून पांड-वांनीं हस्तिनापूरचें राज्य परीक्षितीच्या स्वाधीन केलें, व राहिलेला काळ पृथ्वीप्रदक्षिणा करण्यांत घालविण्याचा त्यांनीं विचार ठरविला.

---

# १७ महाप्रास्थानिकपर्व.



पांच पांडव व द्रौपदी हीं वल्कलें नेसून हस्तिनापुरांतून बाहेर पडलीं. या वेळीं नगरांतील लोकांना व राजकुळांतील मंडळीला जें दुःख झालें तें सांगतां येत नाहीं. सर्व लोक त्यांना लांबपर्यंत पोहोंचविण्यास गेले. शेवटीं युधिष्ठिराचे समजावणीवरून ते मागें फिरले. सर्वांचेपुढें युधिष्ठिर, त्याचेमागून भीम, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी अशीं चाललीं होतीं. सर्वांचेमागें युधिष्ठिराचा आवडता कुत्रा होता. पूर्वेकडे जातां जातां बऱ्याच दिवसांनीं तीं समुद्रतीरावर आलीं. अग्नीच्या सांगण्यावरून अर्जुनानें आपलें गांडीव धनुष्य व अक्षय भाते हीं तेथें समुद्रांत टाकून दिलीं.

पुढें अनेक देश फिरून तीं हिमालयावर आलीं. त्या पर्वतावरून तीं चाललीं असतां द्रौपदी मागचे मागें मरून पडली! तेव्हां, द्रौपदीसारखी साध्वी अशी एकाएकीं मरून कां पडली? असा भीमानें प्रश्न केला. त्यावर धर्मानें सांगितलें कीं,

द्रौपदीचें आपणां सर्वांवर सारखें प्रेम नव्हतें, अर्जुनावर तिची प्रीति अधिक होती; त्याचें हें फळ होय. आणखी थोड्या अंतरावर सहदेव मरून पडला! भीमानें तसें होण्याचें कारण विचारलें. तेव्हां युधिष्ठिर म्हणाला कीं, माझ्यासारखा शहाणा दुसरा कोणीच नाहीं, असें त्यास वाटत होतें. त्याचें हें प्रायश्चित्त त्याला मिळालें. थोडे पुढें गेल्यावर नकुल मरून पडला! तेव्हां, माझ्यासारखा सुंदर पुरुष दुसरा कोणीच नाहीं, या त्याच्या गर्वाचा हा परिणाम आहे, असें मार्गे न पाहतांच भीमास सांगून धर्म पुढें चालला. पुढें अर्जुन पडला! तेव्हां धर्मानें भीमास सांगितलें कीं, माझ्यासारखा शूर कोणी नाहीं असें वाटून सर्व कौरवांना एका दिवसांत मारण्याची यानें प्रतिज्ञा केली; पण ती पाळली नाहीं. त्याचें हें फळ त्याला मिळालें. कांहीं वेळानें भीमही पडला! तेव्हां युधिष्ठिर म्हणाला, तुला आपल्या बळाचा फार गर्व होता. तूं खादाड असून खातांना दुसऱ्याची आठवण करीत नसस, याबद्दल तुला हें शासन झालें आहे.

याप्रमाणें चारी भाऊ व पत्नी मरून पडल्यावर फक्त कुत्रामात्र धर्माबरोबर राहिला !

इतक्यांत रथांत बसून इंद्र तेथें आला, व या रथांत बसून तूं स्वर्गांत चल, असें युधिष्ठिरास म्हणाला. तेव्हां, आपले भाऊ व बायको हीं येथें मरून पडलीं असतां त्यांस टाकून स्वर्गांत येण्याची आपली इच्छा नाहीं, असें त्यानें सांगितलें. यावर इंद्र म्हणाला, तुझ्या आधींच तीं स्वर्गांत गेलीं आहेत. तेथें तुला तीं भेटतील, तूं रथांत बस आणि तिकडे चल. धर्म म्हणाला, हा कुत्रा माझा फार आवडता असून त्याचीही मजवर फार भक्ति आहे. यासाठीं त्याला बरोबर घेण्याची परवानगी असावी. इंद्र तें कबूल करीना. व कांहीं सांगितलें तरी धर्मही कुत्र्याला सोडून स्वर्गास एकटा जाईना. माझ्या भक्ताला स्वर्ग मिळत नाहीं, तर मलाही तो नको, असा आग्रह धरून तो बसला ! **सज्जन आपल्या मित्राला टाकून कोणतेंच सुख भोगण्यास तयार नसतात,** तें असें. असो. मग कुत्रा नाहींसा होऊन त्याचे जागीं प्रत्यक्ष यमधर्म

त्याचेपुढें उभा राहिला! यमधर्मानें त्याच्या सत्यप्रीतीची व मित्रप्रेमाची वाखाणणी केली. नंतर इंद्र, यमधर्म व युधिष्ठिर हे रथांत बसून स्वर्गी गेले.

---

## १८ स्वर्गारोहणपर्व.

स्वर्गांत गेल्यावर आपले भाऊ कोठें आहेत, हें युधिष्ठिर पाहूं लागला. पण ते त्याला कोठेंच दिसतना! इतक्यांत तेथें एका आसनावर बसलेला व तेजानें अगदीं शोभत असलेला असा दुर्योधन त्याचे दृष्टीस पडला! त्याचे इष्टमित्रही तेथें सुखानें बसले होते! ही मंडळी सुखांत पाहून युधिष्ठिर संतापला! आपल्या भावांची व इतर आप्तांची केव्हां भेट होईल असें त्यास झालें होतें. शेवटीं त्यानें असें होण्याचें कारण विचारलें. तेव्हां त्याला असें कळलें कीं, दुर्योधनादि कौरव जरी पापी होते, तरी ते युद्धांत मरण पावल्यामुळें त्यांना स्वर्ग मिळाला आहे. व पांडवांना आपल्या कांहीं कर्मांचीं फळें अद्याप भोगा-

वयाचीं असल्यामुळें ते अजून स्वर्गाला पात्र झाले नाहींत. तेव्हां माझे भाऊ व इतर आप्त मंडळी जेथें असतील, तिकडे मला न्या, असें त्यानें म्हटलें. त्यामुळें त्याचे आप्त नरकाचें दुःख भोगीत होते तिकडे त्याला नेलें. शिवाय अश्वत्थामा मारला गेला, असें मोघम भाषण केल्याबद्दल त्याला एकदां नरकलोक पाहणें भाग होतें ! कांहीं वेळ तेथें राहिल्यावर इंद्रादि देव त्याला भेटण्यास आले. नंतर इंद्राचे सांगण्यावरून युधिष्ठिरानें तेथील गंगेंत स्नान केलें. मग तो इंद्रसभेंत आला. तेथें श्रीकृष्ण, बाकीचे पांडव, अभिमन्यु, द्रौपदीचे पुत्र वगैरे सर्व नात्याची मंडळी त्याला बसलेली दिसली. सर्वांना मोठा आनंद झाला. मग कौरव व पांडव मृत्युलोकांतील आपलीं भांडणें विसरून प्रेमानें स्वर्गाचें सुख घेत राहिले.

---

# बोध.



मुलांनो, महाभारताची गोष्ट येथें संपली. ही वाचून तुम्हांला आनंद वाटला असेल, यांत शंका नाहीं. कारण ती तशीच रसाळ आहे. पण चांगलीं पुस्तकें हीं केवळ करमणुकीकरितां वाचावयाचीं नसतात. त्यांतला चांगला भाग तेवढा घेऊन त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेविलें पाहिजे. तरच वाचल्याचा उपयोग. हें महाभारतच पहाना! याचें सार काय बरें निघतें? नीट विचार करा, म्हणजे तुमचें तुम्हांलाच समजेल. कौरवांनीं कपटानें द्यूत खेळून पांडवांचें राज्य हिरावून घेतलें. त्या राज्याचें वैभव त्यांनीं कांहीं काळ भोगलें. पण शेवटीं त्या सर्वांचा नाश झाला. आतां पांडवांच्या चरित्राचा विचार करा. त्यांनीं केवळ आपलें वचन पाळण्यासाठीं तेरा वर्षें दुःख भोगलें. पण शेवटीं त्यांची फार कीर्ति झाली व त्यांस राज्यही मिळालें. यावरून काय दिसतें बरें? जो धर्मानें वागतो, त्याला पहिल्यानें दुःख होतें, पण शेवटीं कायमचें सुख मिळतें.

व जो अधर्मानें वागतो तो कांहीं काळ जरी सुखांत दिसला, तरी अंतीं त्याचा नाश होतो. कोणतेंही कृत्य चांगलें कीं वाईट हें त्याच्या परिणामावरून ठरवावयाचें असतें. ज्याचा शेवट गोड, तेंच गोड. व ज्याचा शेवट कडू, तेंच खरोखर कडू. हीच मुख्य खूणगांठ बांधून जर तुम्ही प्रत्येक पाऊल टाकाल, तर तुमचें कल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं. हा महाभारताविषयीं सामान्य विचार झाला. यांत जीं निरानराळ्या स्वभावांचीं अनेक माणसें आलीं आहेत, त्यांच्या चरित्रांपासूनही पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. तो बोध तुमचा तुम्हींच काढणें योग्य आहे; पण तुम्ही अजून लहान असल्यामुळें कोणत्या मनुष्यापासन काय बोध घ्यावा, हें तुम्हांला मी काहींचीं उदाहरणें घेऊन सांगतों म्हणजे तुम्हांला विचाराची दिशा समजेल.

---

## श्रीकृष्ण.

—:※:—

पृथ्वीवर दुष्ट लोक माजले, व धार्मिक लोकांना ताप देऊं लागले, कीं परमेश्वर कोणत्या तरी रूपानें पृथ्वीवर येऊन दुष्टांचा संहार व सज्जनांचें रक्षण करितो. या परमेश्वरी रूपाला 'अवतार' म्हणतात. श्रीकृष्ण हा अवतार होता. भक्तांना साहाय्य करणें, त्यांची लाज राखणें, हें परमेश्वराचें ब्रीद. तेंच श्रीकृष्णानें महाभारतांत राखलें आहे. त्यानें द्रौपदीची दोनदां अब्रू राखली. पांडवांना अनेक प्रसंगीं त्यानें योग्य मसलत दिली. अर्जुन हा त्याचा मोठा भक्त; त्या अर्जुनाचा तो सारथि झाला. याचा अर्थ असा कीं, **भक्ताकरितां अगदीं हलकीं कामें करण्यास तो तयार असतो.** याच अर्जुनाचें त्यानें अनेक बिकट प्रसंगीं मोठ्या युक्तीनें रक्षण केलें. परीक्षितीला जिवंत करून त्यानें पांडवांचा वंश कायम ठेविला. श्रीकृष्णाची कृपा नसती तर पांडवांना जयच मिळताना. तेव्हां मुलांनो,

तुम्ही जर श्रीकृष्णाची भक्ति कराल, तर तो पांडवांप्रमाणें तुमचीही पाठ खचित राखील.

---

## युधिष्ठिर.

हा धर्माला सोडून केव्हांही वागत नसे. यावरूनच त्याला धर्म असें नांव मिळालें होतें. पापाला तो फार भीत असे. खोटें भाषण करणें त्याला कधीं आवडत नसे. सर्वांच्या भिडेसाठीं त्यानें एकदांच दुटप्पी भाषण केलें; पण त्याचें त्याला प्रायश्चित्तही मिळालें. दयेचा तर तो पुतळा होता. किती शत्रूंना त्यांचे अपराध पोटांत घालून त्यानें सोडून दिलें, हे तुम्हांला माहीत आहेच. परमेश्वरावर त्याचा मोठा भरंवसा; यामुळें, केवढालीं संकटें पांडवांवर कोसळलीं, तरी त्याचें धैर्य सुटलें नाहीं, व तो आडमार्गाला गेला नाहीं. एक परमेश्वरावर पूर्ण भक्ति असली, म्हणजे संकटाचे काळीं मनुष्याचे अंगीं असें धैर्य येतें. एका भक्तीबरोबर किती तरी सद्गुण धर्माचे अंगीं आले

होते. भावांवर तर त्याचें फार प्रेम होतेंच. तरी सर्व प्राण्यांवर त्याचें सारखें प्रेम असे. तो राजा झाला, तरी त्यानें आपल्या आंगचे सद्गुण सोडले नाहींत. त्याच्या शांत स्वभावाचें तर वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे. भीम, अर्जुन, द्रौपदी हींही रागाच्या भरांत पुष्कळ प्रसंगीं त्याला टाकून बोलत; तरी त्याचा राग न धरतां गोड शब्दांनीं त्यांची तो उलट समजूत घाली. कुटुंबांत जो मुख्य असेल, त्यानें युधिष्ठिरासारखी शांति धरली, तरच कुटुंब सुखानें एकत्र नांदेल.

---

## भीम.

-:o:-

भीम शक्तीबद्दल प्रसिद्ध होता. ज्यांच्या अंगीं शक्ति असते, तीं माणसें बहुत करून घमेंडखोर, उद्धट, दुबळांना छळणारीं अशींच आढळतात. पण भीमाच्या अंगीं अचाट शक्ति असूनही त्याला या दुर्गुणांचें वारेंही नव्हतें. परमेश्वरावर त्याची फार भक्ति होती. वडील माणसांशीं तो अगदीं नम्रतेनें वागे. कौरवांची

खोड मोडून केव्हांच तो पांडवांचें राज्य परत घेता व द्रौपदीच्या छळाचा सूड उगविता, पण युधिष्ठिराची आज्ञा मोडावयाची नाहीं, म्हणूनच त्यानें सगळें सहन केलें. एकटा भीम सर्व कौरवांची लहानपणीं कशी फजिती करी, हें तुम्हीं वाचलेंच आहे. अंगच्या बळावर अनेक प्रसंगीं त्यानें आपल्या भावांचें रक्षण केलें. तेव्हां मुलांनो, अंगांत शक्ति ही पाहिजेच. तीशिवाय कोणताही पराक्रम व्हावयाचा नाहीं. पण भीमाकडे पहा व शक्तीबरोबर कधीं कधीं असणारे दुर्गुणमात्र टाळा.

---

## अर्जुन.

जसा भीम बळानें श्रेष्ठ होता, तसाच अर्जुन शस्त्रास्त्रविद्येंत श्रेष्ठ होता. पण अंगांत इतकी विद्या असूनही त्याला अभिमान नव्हता. हें सर्व श्रीकृष्णाच्या कृपेचें फळ आहे, असें तो मानी. आपल्या बाजूला एकट्या निःशस्त्र श्रीकृष्णाला त्यानें पतकरलें, यावरून श्रीकृष्णाचें

पाठबळ असेल, तरच आपल्या हातून कांहीं पराक्रम होऊन यश मिळेल, असें त्याला वाटत होतें, हें स्पष्ट दिसतें. वडील माणसांच्या आज्ञे-बाहेर तो केव्हांही वागला नाहीं. तेव्हां अंगीं कितीही विद्या असली, तरी श्रीकृष्णाला विसरावयाचें नाहीं, हें लक्षांत ठेवा.

---

## द्रौपदी.



ही अत्यंत साध्वी होती. आपल्या पतींचा व वडील माणसांचा संतोष ठेवण्याकरितां ती फार जपे. ती आपल्या गुणांनीं सगळ्यांनाच प्रिय झाली होती. संकटाचे काळीं मनुष्याची खरी परीक्षा होते. या परीक्षेला द्रौपदी पूर्णपणें उत-रली. पांडवांबरोबर धैर्यानें व समाधानानें वनवा-सांत व अज्ञातवासांत राहून तिनें आपल्या प्रेमळ व शुद्ध वर्तनानें सर्वांना सुखी केलें. श्रीकृष्णावर तर तिचा सगळाच भार होता. यामुळें दोन प्रसंगीं श्रीकृष्णाला तिची लाज राखण्याकरितां कसें बरें धांवत यावें लागलें?

मुलींनो, तुम्ही द्रौपदीचा कित्ता घ्या व तिनें सत्यभामेला दिलेला मंत्र तुम्हीही पाठ करा.

---

## भीष्म.

–:*:–

आपल्या देशांत अगदीं प्राचीन काळीं जे थोर पुरुष होऊन गेले, त्यांत भीष्मासारखा सर्व गुणांनीं थोर कोणीही झाला नाहीं. त्यानें केलेलें कोणतेंही कृत्य पाहिलें, तरी त्यांत दोष म्हणून कुठे दिसत नाहीं. उलट त्याच्या प्रत्येक कृत्यांत विलक्षण धैर्य, शुद्ध वर्तन, खंबीर कर्तव्यनिष्ठा, सत्यप्रीति व ईश्वरभक्ति हे सद्गुण स्पष्टपणें दिसतात. आपल्या बापाच्या सुखाकरितां, जन्मभर लग्न करणार नाहीं, असा त्यानें निश्चय केला व तो अखेरपर्यंत पाळला. यांत त्याचें पित्यावरील प्रेम व भयंकर करारीपणा हे दोन उत्तम गुण दिसून येतात. युद्धाचे वेळीं खरा पक्ष कोणता व खोटा कोणता हें माहीत असतांही केवळ कर्तव्य म्हणून दुर्योधनाचे बाजूनें युद्ध करण्यास तो तयार झाला. त्याचे गुण किती म्हणून सांगावे ?

## विदुर.

-:o:-

हा जरी दासीचा पुत्र होता, तरी गुणांनीं फार थोर होता. हा मोठा चतुर, नीति केव्हांही न सोडणारा व खरें तेंच नेहमीं स्पष्टपणें बोलणारा होता. श्रीकृष्णावर तर विलक्षण याची भक्ति होती. श्रीकृष्ण मध्यस्थी करण्याकरितां आला, तेव्हां धृतराष्ट्राकडील थाटाची मेजवानी टाकून या गरीब भक्ताकडे तो मीठ-भाकर खाण्यास उतरला. पांडवांचें त्यानें अनेक प्रसंगीं आपल्या चातुर्यानें व गोड वाणीनें समाधान तर केलेंच; पण प्रत्येक प्रसंगीं कौरवांनीं त्याचा अपमान केला असूनही वेळ आली, कीं त्यांना पुन्हा योग्य सल्ला देऊन आपलें कर्तव्य करण्यास त्यानें केव्हांही मागें पुढें पाहिलें नाहीं. यावरून त्याला सत्याची आवड किती होती व दुसऱ्यांचें बरें करण्याला तो किती झटत असे, हें दिसून येतें. याच्या चरित्राचा विचार केला, म्हणजे मनुष्य **जन्मानें थोर न होतां गुणांनीं खरा थोर होतो, हें सिद्ध होतें.**

---

## कर्ण.

हा मोठा बुद्धिमान्, पराक्रमी व बाणेदार होता. हे सगळे सद्गुण जरी त्याचे अंगीं होते, तरी त्याच्या आंगचा खरा मोठा गुण म्हटला म्हणजे औदार्य होय. कर्णासारखा दाता आजपर्यंत कोणी झाला नाहीं. एखादा माणूस चांगला उदार असला, म्हणजे 'तो केवळ कर्ण आहे' असें अद्यापही आपल्यांत म्हणतात. हे सगळे सद्गुण जरी त्याचे अंगीं होते, तरी दुरभिमान हा अत्यंत वाईट गुण त्याचे ठिकाणीं फारच असल्यामुळें त्याच्या सगळ्या गुणांची माती झाली. हा दुर्गुण नसता तर भीष्मासारखाच तो थोर झाला असता. **एक दुर्गुण अंगीं असला, तरी कशी सबळी घाण करितो पहा!**

---

## कौरव.

कौरव हे सगळेच सर्व दुर्गुणांचे पुतळे होते, तरी त्यांत दुर्योधन हा जसा वयानें वडील होता, तसाच तो दुर्गुणांनींही वडील होता. हा मोठा

दुराग्रही असून महत्त्वाकांक्षी ( मोठेपणाची फाजील इच्छा करणारा ) होता. त्यांत आणखी कर्णाच्या दुराग्रहाची व शकुनीच्या दुष्ट स्वभावाची त्याला जोड मिळाल्यामुळें तो अगदीं आंधळा होऊन गेला. व विनाकारण पांडवांचा व साध्वी द्रौपदीचा छळ करून शेवटीं त्यानें आपला सगळ्यांचा नाश करून घेतला. **दुष्ट माणसाला सज्जनांचा उत्कर्ष सहन होत नाहीं.** तसेंच पांडवांसंबंधानें कौरवांचें झालें. **सज्जनांचा छळ करण्याचे वेडांत दुष्टांना बरें-वाईट हा विचार राहात नाहीं.** कपट हेंच त्यांचे हातांतील शस्त्र होतें. वडील माणसाची, थोर व पूज्य माणसांची, त्यांना भीति वाटेनाशी होते. अर्थात् याच दुर्गुणांमुळें त्यांचा शेवटीं नाश होतो. कौरवांचें काय झालें, हें तुम्हीं वाचलें आहेच. तेव्हां कौरवांप्रमाणें दुर्गुण आपल्या अंगीं धरूं नका; आपल्या भाऊबंदांचा व आप्तांचा द्वेष करूं नका; म्हणजे पांडवांसारखें शेवटीं तुम्हांला सुख होईल.

---

## शकुनि.

—:*:—

हा गांधारीचा भाऊ व कौरवांचा मामा. हा अत्यंत दुष्ट, घातकी व कपटी होता. कौरवांचे हातून जीं अनेक दुष्ट कृत्यें झालीं, त्यांचें खरें कारण हा चांडाळ शकुनिच होय. याचें साहाय्य मिळालें नसतें, तर कौरवांचे हातून—जरी ते स्वतां दुष्ट होते तरी—इतकीं वाईट कृत्यें झालीं नसतीं. तेव्हां हा सगळा दुष्ट संगतीचा परिणाम झाला. जगांत वाईट सल्ला देणारे विघ्नसंतोषी लोक फार असतात. यांना मुलांनो, जपलें पाहिजे. कोणींही कसाही सल्ला दिला, तरी तो आपल्या हिताचा आहे कीं अहिताचा आहे, याचा नीट विचार करून तो हिताचा असेल, तरच तो आपण घेतला पाहिजे. हें नीट लक्षांत ठेवा.

याप्रमाणेंच बाकीच्या गोष्टींचा तुम्ही विचार करा, म्हणजे त्यांपासून काय घ्यावयाचें हें तुमचें तुम्हांला समजेल.

